


नोंदणी क्र. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

वर्ष ३७ । अंक ४ । जानेवारी १९८४



अनुक्रमणिका






प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ३७ । अंक ४ । जानेवारी १९८४
किंमत ४ रुपये । वार्षिक वर्गणी ३० रुपये



---



संपादक
मे. पुं. रेगे

---

संपादकीय पत्रव्यवहार :
मे. पुं. रेगे,
संपादक, ' नवभारत ' मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई–४१२ ८०३ (जि. सातारा)

---

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
श्री. ग. दीक्षित,
व्यवस्थापक, ' नवभारत ' मासिक,
द्वारा : दी प्राज्ञ प्रेस, वाई–४१२ ८०३.
( जि. सातारा )

---

या नियतकालिकाच्या प्रकाशनार्थ महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाकडून अनुदान मिळाले आहे.

अनुक्रमणिका

# नवभारत

जानेवारी १९८४

## अनुक्रम



## लेखक-परिचय

■ **वा. द. दिवेकर** : 'बिब्लिऑग्राफी ऑफ इकॉनॉमिक हिस्टरी' या ग्रंथाचे संपादक; रीडर इन इकॉनॉमिक हिस्टरी, गोखले अर्थशास्त्र संस्था, पुणे – ४. ■ **ना. बा. मराठे** : निवृत्त संपादक, इंडियन नॅशनल बिब्लिऑग्राफी, सेंट्रल रेफरन्स लायब्ररी, बेल्व्हेदेर, कलकत्ता– २७; धर्मकोशाचे विशेष कार्यकर्ते, प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई– ४१२ ८०३. ■ **अनिरुद्ध कुलकर्णी** : कवी, चिकित्सक लेखक व कॉन्टिनेंटल प्रकाशनचे मालक, विजयानगर कॉलनी, पुणे ४११ ०३०. ■ **चंद्रकांत पाटील** : कवी; हिंदी व मराठी अशा दोन्ही भाषांतून लेखन; अनेक मासिकांच्या विशेषांकांचे संपादन; लघु-नियतकालिकांच्या चळवळीत सहभाग; वनस्पतिशास्त्राचे प्राध्यापक, सरस्वती भुवन महाविद्यालय, औरंगाबाद. ■ **रा. ग. जाधव** : मराठी समीक्षक, मराठीचे माजी प्राध्यापक व विश्वकोशाच्या मानव्यविद्या कक्षेचे प्रभारी विभाग संपादक, वाई–४१२ ८०३. ■ **वैजनाथ महाजन** : मराठीचे प्राध्यापक, कन्या महाविद्यालय, सांगली–४१६ ४१६ ■ **रा. ना. चव्हाण** : दलित-मित्र, सामाजिक कार्यकर्ते, सामाजिक चळवळींचे चिकित्सक अभ्यासक व लेखक; १३७८ रविवार पेठ, वाई–४१२ ८०३.



**चुकीची दुरुस्ती** : जानेवारी १९८४ च्या या अंकात अनवधानाने पृ. १०, १२, १४ व १६ वर जानेवारी १९८३ असे छापले गेले आहे. ते जानेवारी १९८४ असे वाचावे.

—संपादक

अनुक्रमणिका








## संपादकीय

### हिंदूंची जबाबदारी

हिंदू एकात्मता यात्रा निर्विघ्नपणे आणि शिस्तीत पार पडली. ही यात्रा संघटित करण्यामागे काही राजकीय डाव असेल, नजीकच्या भविष्यकाळात ह्या यात्रेमुळे एखाद्या राजकीय पक्षाचा काही विशेष लाभ होईल असे मानणे कठीण आहे. हिंदुत्वाची जाणीव अधिक धारदार बनल्यामुळे भारतीय जनता पक्षाला असलेला पाठिंबा वाढेल अशी भीतियुक्त अपेक्षा अनेकांना आणि आशायुक्त अपेक्षा कित्येकांना वाटते यात शंका नाही. पण ह्या भीतीला किंवा आशेला काही अर्थ नाही. कोणत्याही देशात बहुसंख्य असलेल्या जमातीला एका विशिष्ट राजकीय पक्षात सामावून घेणे, सबंध जमातीची एका विशिष्ट राजकीय पक्षाशी निष्ठा आकर्षून घेणे ही अशक्यप्राय गोष्ट आहे. आपला देदीप्यमान भूतकाल, उज्ज्वल भविष्यकाळ, प्राचीन ऋषी आणि आधुनिक हुतात्मे ह्या, रविवारी आदराने आणि भक्तिभावाने बोलायच्या गोष्टी असतात. आठवड्याच्या इतर दिवशी व्यवहाराच्या गोष्टी– रोजगार, घराची भाडी, अन्नधान्याचे भाव, राजकीय सत्तेतील सहभाग ह्या गोष्टी– बोलायच्या असतात आणि त्यांच्यासाठी झगडायचे असते. आणि राजकीय पक्ष ह्या परस्परविरोधी आर्थिक आणि सामाजिक हितसंबंधांशी संबंधित असतात. पण कोणत्याही चैतन्यशील समाजात रविवारची कर्मकांडी श्रद्धा आणि एऱ्हवीचा गद्य व्यवहार यांच्या पलीकडे असलेला, समाजाला एकात्मता देणारा असा निष्ठेचा खोल अंतःप्रवाह वाहत असतो. त्याच्यामुळेच रविवारच्या कर्मकांडाला अर्थ प्राप्त होतो आणि एऱ्हवीच्या व्यवहाराला दिशा आणि शिस्त लाभते. आजची देशाची स्थिती पाहिली तर हा प्रवाहच क्षीण झाला आहे की काय, किंबहुना आटला आहे की काय, अशी भीती वाटल्यावाचून राहत नाही.

लोकशाही व्यवस्थेत बहुसंख्य जमात जर एका राजकीय पक्षाच्या झेंड्याखाली एकत्र आली तर देशात आणीबाणीची परिस्थिती निर्माण झाली आहे असा तिचा ग्रह झाल्याची ती खूण असेल. सर्व सामाजिक, आर्थिक भेदभाव विसरून केवळ आपले अस्तित्व टिकवून धरण्यासाठी आपण एकत्र आले पाहिजे अशी तिची धारणा झाल्याशिवाय असे घडणार नाही. आज अशी परिस्थिती देशात आहे, असे दिसत नाही. किंवा असे आहे का, की अशी परिस्थिती निर्माण झाली आहे आणि तिची जाणीव बहुसंख्य जमातीला होईल अशी भीती अनेकांना वाटते ?

एकात्मता यात्रेच्या संघटकांना उत्साह वाटावा एवढा प्रतिसाद तिला मिळाला. ह्याचा अर्थ कसा लावता येईल ? ह्याचा एक अर्थ असा की गंगा, तीर्थ, वेदमंत्र, पूजा, प्रसाद इ. गोष्टींविषयीचा भोळा पूज्यभाव अजूनही बऱ्याच, किंबहुना बहुसंख्य हिंदूंच्या मनांत घर करून आहे. आध्यात्मिक साधनेत हा भाव उपकारक ठरत असेलही. पण आधुनिक राष्ट्र संघटित करायला तो फारसा कामी येणार नाही. पण ह्या सोहळ्यात सामील झालेल्या अनेकांच्या दृष्टीने गंगा हे ह्या राष्ट्राच्या अस्मितेचे, एकतेचे, सातत्याचे, त्याचा प्राचीन इतिहास, आज ठाकलेला वर्तमान आणि भविष्य यांना जोडणाऱ्या सूत्राचे, प्रतीक असेल.

ऐ आबरुदे गंगा, वो दिन है याद तुझको  
उतरा तेरे किनारे जब कारवाँ हमारा।  
यूनान मिस्र रूमा सब मिट गये जहाँसे  
अबतक मगर है बाकी नामोनिशाँ हमारा ।

ह्या भूमीच्या त्यांच्या संकल्पनेत गंगा, यमुना, गोदावरी आणि कृष्णा, सर्व भारतीय नद्या, पण प्रथम गंगा आणि सर्व नद्यांच्या रूपात गंगाच, ओवलेल्या असतील, संस्कृतीच्या उदयापासून ह्या भूमीत घडलेला इतिहास त्यांच्या दृष्टीने ह्या भूमीच्या संकल्पनेचा अविभाज्य भाग असेल, ही आमची भूमी आहे अशी त्यांची भावना असेल, आमच्या पूर्वजांनी ती जिंकली आणि तिच्यावर राज्य केले म्हणून ती आमची नव्हे, भोगभूमी म्हणून आमची नव्हे, माणसाची आई त्याची असते अशी ती आमची आहे, तिचा इति-

अनुक्रमणिका







ह्रास आमचा इतिहास आहे, त्याचे वैभव हे आमचे वैभव, आमचा अभिमान आहे आणि त्याची लज्जा ही आमची लज्जा आहे, ह्या इतिहासाचे ओझे आम्ही वाहत नाही, तो आमच्या अंतरंगाशी एकजीव झाला आहे, अस्पृश्यतेची शरम आमच्या अंतःकरणात भिनलेली आहे आणि बुद्धाच्या विमोचक शिकवणीने ते संस्कारितही आहे, या आमच्या वारशामुळे आम्ही हे आम्ही आहोत आणि आम्ही आमचे राहून जगाला आणि भविष्याला सामोरे जाऊ अशी त्यांची भावना असेल. हिंदूंनी दडपून टाकावी किंवा दडवून ठेवावी अशी ही भावना नाही. आपल्या भूमीला पारखे झालेल्या आणि जगभर विखुरलेल्या ज्यू जमातीने जरुशलेमचे स्मरण टिकवून धरले. 'टिकवून धरले' असे म्हणणेही गैर आहे. जरुशलेमचे त्यांचे स्मरण नष्ट झाले असते तर ते ज्यू उरले नसते.

हे जरुशलेम, तुला मी विसरलो तर
माझा हात झडून जावो;
माझ्या उजव्या हाताचे सारे कसब नाश पावो
हे जरुशलेम,
मी तुला विसरलो तर

भारतीयही आपले स्वत्व विसरले तर आपल्या भूमीतच परागंदा होतील. समजा, आम्हाला हा देश सोडून दुसऱ्या देशात जाऊन वसावे लागले असते, तर आमच्या नवीन देशातल्या नदीला आम्ही गंगा म्हटले असते.

पण हा देश केवळ हिंदूंचा नाही. तो जितका हिंदूंचा आहे, तितकाच भारतीय मुसलमानांचा आहे, भारतीय ख्रिश्चनांचा आहे, पारशांचा आहे. आणि म्हणून गंगा, पवित्र गंगा ही सर्व भारतीयांची सामायिक नदी असली पाहिजे. तशी ती आहेच. पण तिच्या पावित्र्याची व्याख्या सर्व धर्मीयांना मान्य होईल अशी केली पाहिजे. राष्ट्रध्वज जसा सर्वांना पवित्र असतो, तसे गंगेचे पावित्र्य असले पाहिजे. शंकराने तिला जटेत धारण केले म्हणून ती पवित्र नाही. भारतीय नदी म्हणून, भारताच्या संस्कृतीची चिरकालिक साक्षी म्हणून ती पवित्र आहे. गंगेचे पावित्र्य हिंदूंनी स्वतःपुरते मर्यादित केले तर तो त्यांचा करंटेपणा ठरेल. पण ज्या भारतीयाला गंगेचे धर्मनिरपेक्ष पावित्र्य भावत नसेल, तो केवळ तांत्रिक दृष्टया भारतीय आहे; मनाने तो भारतीयच नाही असे म्हणावे लागेल.

तेव्हा गंगा हे संबंध राष्ट्राच्या एकतेचे प्रतीक आहे, केवळ हिंदूंच्या एकतेचे प्रतीक नाही. हिंदूंच्या एकात्मतेचा परिपोष करण्यासाठी ह्या राष्ट्रीय प्रतीकाचा वापर करणे गैर आहे, हे उघड आहे. हिंदू जमातीला हिंदू जमात म्हणून एकात्म करण्यासाठी आपण गंगेचा वापर केला तर एकात्मता साधताना आपण भेदभावही निर्माण करू. अशाने आपण गंगेची थोरवीच नाहीशी करू.

बहुसंख्य जमातीला एकात्म करण्यासाठी प्रयत्न करण्याचे कारणच काय ? हा खटाटोप करावा असे कुणाला का वाटावे ? जे घडते ते घडावे अशी काही कारणे घडलेली असतात म्हणून ते घडते. आणि तटस्थ दृष्टीने जो देशातील घडामोडीकडे पाहील, त्याला हिंदू एकात्मता यात्रा संघटित करावी असे कित्येकांनी का ठरविले असेल त्याची कारणे सहज दिसून येतील.

मीनाक्षीपुरम् येथे दलितांनी इस्लामचा स्वीकार करून धर्मांतर केले ही प्रसिद्ध घटना घेऊ. अशी घटना घडली की हिंदूंना उपदेश करण्यात येतो तो असा, की तुमच्या धर्मातच जातिभेदाची व्यवस्था आहे, सर्व हिंदू समान अशी शिकवण नाही आणि तशी वागणूक नाही, काही जातींना तुम्ही अस्पृश्य मानता, पशूहून हीन अशी वागणूक त्यांना देता, त्यांना स्वाभिमान असेल तर ते हिंदू राहणार नाहीत, त्यांनी हिंदू धर्म सोडून दिला व दुसरा त्यांना समानता देणारा धर्म स्वीकारला तर ते योग्यच म्हटले पाहिजे. हिंदूंना करण्यात येणारा हा उपदेश अगदी योग्य आणि आवश्यक आहे. पण दलितांना कुणी असे सांगत नाही, की "तुम्ही हिंदू धर्म सोडता हे योग्यच आहे. पण तुम्ही इस्लाम का स्वीकारता? आज मानवी ज्ञान ज्या अवस्थेला पोचले आहे, सर्वच धर्मांची जी वैज्ञानिक व तत्त्वज्ञानात्मक चिकित्सा झाली आहे ती पाहता एक धर्म सोडून दुसरा धर्म स्वीकारण्याला काही अर्थच उरलेला नाही.

तुम्हाला जी समानता पाहिजे आहे ती सामाजिक दर्जाची आणि आर्थिक स्थितीची समानता आहे. ही समानता जर तुम्हाला नाकारण्यात येत असेल तर तुम्हाला संघटित होऊन, राजकीय, सामाजिक चळवळ उभी करून, सत्तेवर दडपण आणून किंवा सत्तेत सहभाग संपादन करून ती साधावी लागेल. जगभर जे इस्लामी समाज आहेत त्यांच्यांत सामाजिक, आर्थिक समता आहे असे मानणे हास्यास्पद आहे. इस्लाममध्ये गुलामगिरीच्या प्रथेला धार्मिक मान्यता आहे, गुलामांना कनवाळूपणे वागवावे अशी इस्लामच्या प्रेषितांची शिकवण आहे; परंतु गुलामगिरीची पद्धतच मानवी प्रतिष्ठेशी विसंगत आहे अशी शिकवण नाही. हा धर्म समतावादी कसा मानता येईल ? "

ज्या मुसलमान धर्मगुरूंनी किंवा इतरांनी त्यांना इस्लामची दीक्षा दिली असेल त्यांना असे कुणी सांगत नाही, की " हे लोक हिंदूधर्मावर चिडले आहेत आणि त्यांनी हिंदू धर्म सोडण्याचे ठरविले आहे. हे त्यांचे करणे योग्यच आहे. पण हिंदूधर्मातील अन्याय्य रूढींमुळे ते त्या धर्मावर रागावले ह्याचा अर्थ असा नव्हे, की महंमद पैगंबर हे ईश्वराचे अखेरचे प्रेषित आहेत या गोष्टीवर आणि पैगंबरसाहेबांशी जे कुराण ईश्वराने देवदूतामार्फत प्रकट केले ते सर्वतोपरी सत्य आहे या गोष्टीवर त्यांची खरीखुरी श्रद्धा बसली आहे. ते केवळ रागाने मुसलमान होऊ पाहत आहेत, धार्मिक श्रद्धेमुळे नव्हे. अशा व्यक्तींना तुम्ही मुसलमान करून घेणे योग्य नव्हे. ती धार्मिक श्रद्धेची चेष्टा ठरेल. " मुसलमानांना ही गोष्ट इहवादी हिंदू सांगत नाहीत आणि इहवादी किंवा धार्मिक मुसलमान सांगत नाहीत.

स्वातंत्र्यपूर्वकाळी मुस्लिम लीगने हिंदू आणि मुसलमान ही दोन राष्ट्रे आहेत हा सिद्धांत मांडून देशाची फाळणी घडवून आणली आणि ती घडवून आणण्यासाठी हत्यार म्हणून पद्धतशीर रीतीने जातीय दंगली घडवून आणल्या. ह्या घटनेमुळे भारतीय मुसलमानांना कायमचे किंवा यत्किंचितही अपराधी वाटायचे कारण नाही हे मान्य करूया. भारतात मुसलमान अल्पसंख्य आहेत आणि म्हणून आपल्या हक्कांचे संरक्षण करण्यासाठी मुसलमान म्हणून त्यांना संघटित व्हावे लागते हेही मान्य करूया. पण आपण निदान एवढी अपेक्षा करू की फाळणीनंतर भारतात मुसलमानांची राजकीय संघटना ' मुस्लिम लीग ' हे नाव धारण करणार नाही, द्विराष्ट्रवादाची आठवण करून देणारे, प्रयत्नपूर्वक घडवून आणलेल्या भीषण जातीय दंगलींची आठवण करून देणारे हे नाव वगळून दुसरे कोणतेही नाव अशी संघटना स्वीकारील. पण मुस्लिम लीग भारतात टिकून आहे आणि सुस्थित आहे आणि सर्वच राजकीय पक्ष सोयीचे असेल तेव्हा तिचे साहाय्य बिनदिक्कत घेतात.

आणीबाणीमध्ये मूलभूत हक्कांवर आणि व्यक्तिस्वातंत्र्यावर–आविष्काराच्या स्वातंत्र्यावर– खूपच मर्यादा पडल्या. आणीबाणी कितपत आवश्यक होती किंवा हितकारक होती हा विवाद्य प्रश्न आहे. पण कॅथलिक चर्चने व्यक्तिस्वातंत्र्याचा किंवा मूलभूत हक्कांचा हा जो संकोच करण्यात आला त्याच्याविषयीची आपली नापसंती कधी प्रकट केली नाही. पण जेव्हा धर्मांतर करण्याच्या कृतीवर काही बंधने घालण्याचा प्रस्ताव करण्यात आला तेव्हा चर्चने चळवळ केली, कधी नव्हे ते धर्मगुरू मैदानात उतरले आणि त्यांनी सरकारविरोधी निदर्शनांचे नेतृत्व केले. चर्चलाही हा प्रश्न विचारता येईल, की तुम्ही जी धर्मांतरे घडवून आणता ती कोणाची असतात ? ख्रिस्ती धर्माची गूढ तत्त्वे– उदा. ईश्वर, त्याचा पुत्र आणि पवित्र आत्मा ही एकात्म त्रयी आहे, पोप जेव्हा धर्मासनावरून देवशास्त्राविषयीचे सिद्धांत मांडतात तेव्हा ते (पोप) अस्खलनीय असतात, इ.– निरक्षर, भुकेल्या आदिवासी व्यक्तीला पटलेली असतात म्हणून तुम्ही तिला आपल्या धर्मात घेता का ?

हिंदू धर्माच्या सिद्धांतांची चिकित्सा होते. इस्लामची करायला कुणी धजावत नाही. भगवान श्रीकृष्णांनी अनेक–कल्पनेला भोवळ येईल इतक्या–स्त्रियांशी लग्न केल्यामुळे महात्मा जोतीबा फुले यांनी त्यांचे वाभाडे काढले आहेत. इतर धर्मांतील विभूतींविषयी एवढ्या रोखठोकपणे तर सोडाच, पण सौम्यपणेही टीकेचा उद्गार काढणे शक्य आहे का ? घटनेला अभिप्रेत असलेला समान नागरी कायदाही का करण्यात येत नाही ? ह्याचे उत्तर सर्वांना माहीत आहे.





ह्या परिस्थितीत काही हिंदूंना असे वाटणे शक्य आहे, की " 'इहवाद' वगैरे फक्त बोलायचे शब्द आहेत. राजकारणात गठ्ठा मतांची केवळ कदर आहे. जातिभेदांमुळे हिंदू समाज विस्कळीत आहे, त्याची संख्या कधी एकवटत नाही आणि म्हणून त्याचा प्रभाव पडू शकत नाही. हिंदू समाजाला खूष करायचे कुणाला कधी कारण पडत नाही, त्याला गृहीत धरून चालता येते. अल्पसंख्याक समाज आपल्याबरोबर जास्तीत जास्त कसे येतील याची काळजी प्रत्येक राजकीय पक्षाला असते. तेव्हा हिंदूंना हिंदू म्हणून एकत्र आणले तर या खेळाला आळा पडेल. हिंदू अस्मितेची मग कदर होईल. सर्व राजकीय पक्ष मुसलमानांच्या बाबतीत, ख्रिश्चनांच्या बाबतीत जी पथ्ये पाळतात, ती ते हिंदू समाजाच्या बाबतीतही पाळतील. आणि इतर समाजही हिंदू समाजाला वचकून राहतील." आम्ही हिंदू आहोत ह्याचा आम्हाला अभिमान आहे ह्या घोषणेतून दुखावलेला स्वाभिमानच व्यक्त होतो. आणि ही घोषणा देणारे केवळ ब्राह्मण नाहीत किंवा प्रामुख्याने ब्राह्मण नाहीत, ते इतर जातीतील आहेत. महात्मा जोतीबा फुल्यांनी जातिभेदावर आधारलेल्या विषम समाजरचनेबद्दल ब्राह्मणांना दोष दिला होता आणि जाति-व्यवस्थेतील अन्याय ब्राह्मणेतरांना समजून दिला, की ते जातिव्यवस्था नाकारतील, कनिष्ठतेच्या छापापासून मुक्त होतील, समता प्रस्थापित करतील अशी त्यांची आशा होती. पण तसे घडले नाही. बहुसंख्य लोक जातींना चिकटून राहिले, पारंपरिक हिंदू राहिले आणि ते हिंदुत्वाच्या आपल्या अभिमानाचा घोष करीत आहेत. ह्या व्यवस्थेची एवढी पकड लोकांवर का आहे, हे कुणाला समजले आहे असे दिसत नाही. सामाजिक समतेसाठी जर दलित आतापर्यंत इतर धर्मांत जात होते, तर इतके दलित, इतक्या कनिष्ठ जाती हिंदू राहिल्याच का? राजसत्ता मुसलमानांच्या हाती असताना का राहिल्या?

ते काही असो. हिंदूंनी हिंदू म्हणून एकत्र येण्याला काही अर्थच नाही. भारत स्वतंत्र झाला आहे आणि भारतात लोकशाही व्यवस्था नांदत आहे ही गोष्ट हिंदूंना एक करू पाहणाऱ्यांना पटलेली नाही असे म्हणावे लागते. कारण अजून अल्पसंख्याकांपासून हिंदूंचे रक्षण करणे आवश्यक असल्या-प्रमाणे ते बोलतात व वागतात. ब्रिटिश अमदानीत ते ठीक होते, कारण ब्रिटिश पक्षपाती असल्याचा खराखोटा आरोप करता आला असता. पण आता स्वाभाविकपणे राज्यसत्ता ज्यांच्या हाती आहे ते बहुसंख्य हिंदू आहेत, सैन्यात बहुसंख्य हिंदू आहेत, पोलिसांत हिंदू आहेत. आता हिंदूंना मुसलमानां-पासून संरक्षण नको, ख्रिश्चनांपासून संरक्षण नको; आता हिंदूंना जे संरक्षण पाहिजे आहे ते स्वतःपासून पाहिजे आहे. कारण भ्रष्टाचार करणारे हिंदू आहेत, दलितांवर अत्याचार करणारे हिंदू आहेत, स्त्रियांना हुंड्यासाठी जाळणारेही हिंदू आहेत, बहुसंख्य हिंदू अतोनात गरीब आहेत ( बहुसंख्य मुसलमान व बहुसंख्य ख्रिश्चनही अतोनात गरीब आहेत ). ही त्यांची अमानुष गरिबी सहन करणारे, माणसांची जीवने चिरडून टाकणारी गरिबी सहन करणारे, ती टिकवून धरणारे हिंदू आहेत. हिंदू समाजाचे हे खरे प्रश्न आहेत आणि ते सोडविण्यासाठी जे ज्ञान आवश्यक आहे आणि जे कर्तृत्व आणि ज्या निष्ठा आवश्यक आहेत, त्या हिंदूंनी आत्मसात केल्या आणि अंगी बाणवल्या तर हिंदू मनात आणि समाजात आमूलाग्र क्रांती होईल, समाजाची एक नवी घडी बसेल आणि भविष्याच्या त्या हिंदू समाजात अल्पसंख्याकांचा प्रश्नच उरणार नाही. कारण हा नवा हिंदू समाज हिंदू असणारच नाही. तो भारतीय समाज बनलेला असेल. भारतीय समाजाच्या निर्मितीसाठी हिंदू समाजाने कात टाकायची आज वेळ आली आहे. कर्तृत्वाला आज दाही दिशा मोकळ्या आहेत. जगाच्या रंगभूमीवर स्वतंत्र, बलिष्ठ, विद्याविनयसंपन्न राष्ट्र म्हणून पाऊल टाकायच्या तयारीला आता लागले पाहिजे. क्षुल्लक प्रश्नात गुंतून पडण्याचा हा काळ नाही.

०००



अनुक्रमणिका

# अठराव्या शतकातील
# मराठी व्यापारी-सावकारवर्गाचा उदय व अस्त*

वा. द. दिवेकर

कै. दत्तोपंत आपटे स्मृतिदिनानिमित्त बऱ्याच वर्षांपूर्वी प्रा. धनंजयराव गाडगीळ यांनी एक महत्त्वपूर्ण व्याख्यान दिले होते. त्यात त्यांनी दोन सूचक विधाने केली होती. पहिले म्हणजे, त्यांच्या शब्दांत सांगावयाचे तर, "हिंदुस्थानच्या इतर सर्व प्रदेशात समाजरचनेचे एक अत्यंत महत्त्वाचे अंग समजला गेलेला वाणीसमाज मुळात आपणाकडे (महाराष्ट्रात) नसावा हे एक कोडेच वाटते. या कूट प्रश्नाकडे महाराष्ट्राचा वसाहतकाल व महाराष्ट्र समाजरचनेचा आदिकाल यांच्या अभ्यासकांनी लक्ष देणे जरूर आहे.[1] त्यांचे दुसरे सूचक विधान असे होते की, अठराव्या शतकात महाराष्ट्रातील व्यापारी-सावकार यांचा व्यवहार गुजराती वगैरे महाराष्ट्राबाहेरून नवीनाने आलेल्या इतरांच्या मानाने मोठ्या प्रमाणावर वाटतो. परंतु पुढील काळात मराठी व्यापारी-सावकार टिकून राहू शकले नाहीत याची कारणमीमांसा करणे महत्त्वाचे आहे.[2] आजच्या माझ्या व्याख्यानात प्राध्यापक गाडगिळांच्या वरील दोन महत्त्वाच्या विधानांच्या अनुषंगाने मुख्यत्वेकरून या विषयाची चर्चा करावयाचे मी योजिले आहे. व्याख्यानाला वेळेचे बंधन असल्यामुळे सर्वच ठिकाणी तपशीलात जाता येणार नाही. तरी पण, काही ठिकाणी प्रातिनिधिक स्वरूपाची उदाहरणे देऊन मुद्द्यांची मांडणी करण्याचा प्रयत्न करीन.

सुरवातीसच एकदोन गोष्टींचा खुलासा करतो. प्रा. गाडगिळांनी वापरलेला 'व्यापारी-सावकार' हा शब्दप्रयोगच, साधारणपणे मोठ्या प्रमाणावर तो व्यवसाय करणाऱ्यासंबंधाने आजच्या व्याख्यानात मीही वापरला आहे. मात्र अशा व्यापारी-सावकारांसंबंधाने मी इथे वापरलेली 'वर्ग' ही संज्ञा पूर्णार्थाने मार्क्सवादातील 'वर्गकलह' या सैद्धान्तिक कल्पनेतील नसून साधारणपणे, एकाच प्रकारचे आर्थिक हितसंबंध असलेला समाजाचा एक महत्त्वाचा भाग, एवढ्यापुरती ती मर्यादित आहे. सावकारांच्या एकदोन याद्यांचा प्रा. गाडगिळांनी उल्लेख केला होता. त्यांचा उल्लेख मीही उदाहरणादाखल, माझ्या ह्या व्याख्यानात करणार आहे.

एखाद्या प्रदेशात विशिष्ट तऱ्हेचा स्थानिक व्यापारीसमाज निर्माण होण्यास, किंवा न होण्यास त्या प्रदेशाची आर्थिक-भौगोलिक परिस्थिती बरीच कारणीभूत असते. उदाहरणार्थ, जगभरचा अनुभव असा, की समुद्रकिनाऱ्यावर वसतिस्थाने असलेले लोक सागरी व्यापारव्यवसायात पुढे येण्याची जेवढी शक्यता असते, तेवढी ती देशातील अंतर्गत भागात वसतिस्थाने असणाऱ्यांबद्दल नसते. पोर्तुगीज, अरब किंवा आपल्याकडील गुजराती लोकांचा याबाबत उदाहरणादाखल उल्लेख करता येईल. तथापि, भौगोलिक कारणघटकाला अवास्तव महत्त्वही देता कामा नये. एखाद्या समाजाचा आनुवंशिक, सांस्कृतिक, राजकीय पूर्वेतिहास यांचाही याबाबतीत महत्त्वाचा वाटा असतो व त्यांचा विचार करणे आवश्यक ठरते.

महाराष्ट्रात १७-१८ व्या शतकापूर्वी एतद्देशीय व्यापारी-सावकारांचा खास वर्ग नव्हता. योग्य ती अनुकूल परिस्थिती निर्माण झाल्यावर तो उदयास आला. कोणत्या समाजघटकांतून तो निर्माण झाला ह्याची चर्चाही प्रस्तुतच्या विषयाशी संबंधित आहे.

* दत्तोपंत आपटे स्मृतिदिन, शनिवार, आश्विन कृ. प. १३ धनत्रयोदशी, दिनांक १३ नोव्हेंबर १९८२- व्याख्यान.



अनुक्रमणिका






ज्या परिस्थितीतून तो उदयास आला व पुढे विस्तारला त्याचे स्वरूप कसे होते, आणि त्याच्या अस्ताची बीजे त्या परिस्थितीतच दडली होती की काय, हेही पाहावे लागेल.

## आर्थिक–सांस्कृतिक पूर्वेतिहास

वसाहतपूर्व महाराष्ट्र हा एक भौगोलिक दृष्ट्या डोंगराळ, खडकाळ अरण्यप्रदेश असून इथे एतद्देशीय असे नाग, भिल्ल, कोळी, मावळे इत्यादी लोक प्रामुख्याने राहत असत. महाराष्ट्राच्या व मराठी भाषेच्या जडणघडणीला खरी सुरवात प्रामुख्याने यादवकालातच झाली असे म्हणावयास हरकत नाही. त्यापूर्वी 'महाराष्ट्र' नावाचा देशच भारतात नव्हता किंवा 'मराठी' भाषा वापरात नव्हती, असे नव्हे. तसे पाहिले तर सहाव्या शतकात वराहमिहिराने भारतातील या भागाचा 'महाराष्ट्र' या नावाने उल्लेख केलेला आढळतो. आपण आज बोलतो त्या मराठी भाषेला सुमारे पाचव्या ते दहाव्या शतकात तिचा वेगळा असा घाट येऊ लागला असे दिसते. परंतु सुमारे बाराव्या शतकापासून महाराष्ट्र हा एक वेगळा सांस्कृतिक प्रदेश म्हणून ओळखू येऊ लागला, असे म्हणता येईल.

तेराव्या शतकातील उत्तरकालीन यादवांचा काळ सोडल्यास, सतराव्या शतकापर्यंत हा प्रदेश मुख्यत्वे आंध्र, कन्नड आणि तुर्क पठाणादी मुसलमान अशा परकीय राज्यकर्त्यांच्या आधिपत्याखालीच होता. परकीय राजवटींखाली वावरताना तत्कालीन मराठी समाजाची आर्थिक व व्यापारी व्यवहारांची पातळी एकंदरीने बेताच्याच उंचीची राहिली असावी असे दिसते. व्यापारी वृत्तीस पोषक अशा तत्कालीन नवागत धर्मासंबंधी त्यांच्यांत फारसे आकर्षण निर्माण झाल्याचे दिसत नाही. हे त्यांच्या निम्नस्तरीय व्यापार–व्यवहाराचेही अेक लक्षण म्हणून मानता येतील.

कन्नड राष्ट्रकूटांनी (इ. स. ७६० ते ९७३ पर्यंत) महाराष्ट्रावर राज्य केले. त्या वेळी त्यांची राजधानी कर्नाटकातील मालखेट येथे होती. कन्नडिगांच्या स्वतःच्या मायभूमीत ह्या वेळी जैन धर्माचा प्रसार झपाट्याने होत होता. तिकडे जैन धर्मात वज्रनंदीसारख्या आचार्यांनी केलेल्या अुदारमतवादी[3] मतप्रचारामुळे व्यापारी वृतीला प्रोत्साहन मिळाले होते. या काळात अनेक कन्नड जैन श्रेणी व व्यापारी संघ कर्नाटकात ठिकठिकाणी अस्तित्वात येत होते. परंतु कर्नाटकात लोकप्रिय झालेला जैन धर्म त्याच राष्ट्रकूटांच्या अंकित असलेल्या महाराष्ट्रात मात्र म्हणावा तसा पसरला नाही. नंतरचे कन्नड चालुक्य व कलचुरी (इ. स. ९७३ ते ११९०) ह्यांच्या काळात कर्नाटकात जैन धर्माची जागा लिंगायत धर्माने घेतली. लिंगायत धर्म तर अनेक बाबतीत जैन धर्माहूनही अधिक उदारमतवादी होता. त्याचा कन्नड व्यापारीवर्गाने पुढे होऊन स्वीकार केला. मात्र तत्कालीन महाराष्ट्र प्रदेश कन्नड राज्यकर्त्यांच्या अमलाखाली असूनही येथील एतद्देशीयांत ना जैन धर्माचा म्हणावा तसा प्रसार झाला, ना लिंगायत धर्माचा.

उत्तरकालीन यादव हे पहिले मराठी राज्यकर्ते असे म्हणता येईल. तथापि, उत्तर यादवकालातसुद्धा मराठी लोकांची स्वतःची सामाजिक, सांस्कृतिक स्थिती फारशी विकसित झालेली नसावी. विठोबा, खंडोबा, व्यंकोबा, रेणुका इत्यादी त्यांच्या देवदेवता तर कन्नडच होत्या. यादवकालीन महाराष्ट्रातील राजमंत्री, सेनापती, साहित्यिक, व्युत्पन्न पंडित हेही मुख्यत्वे कन्नड-भाषिकच होते. महाराष्ट्रात व्यवहार करणाऱ्या तत्कालीन व्यापारी श्रेणीही कन्नडिगांच्याच बनल्या होत्या.[4] महाराष्ट्रात प्रचलित असलेली त्या काळची वजने, मापे, नाणी यांची नावेही कन्नड भाषेतीलच होती. एतद्देशीय मराठा, नाग, कोळी, भिल्ल इत्यादी डोंगरी मराठी लोक त्यांच्या बलुतसंस्कृतिप्रधान अलग, स्वयंशासित खेड्यांतून बव्हंशी त्या काळी वास्तव्य करून राहत असावेत. बलुत्यातील बलुतेदारांप्रमाणेच जवळजवळ एतद्देशीय मराठी वाणी आपल्या व्यवसायवृत्तीची कामे करीत असावेत असे दिसते. यादवकाळातसुद्धा देशावरील मोठ्या प्रमाणावरचा व अंतर्गत व्यापार कन्नड, वैश्य व लिंगायत वाण्यांच्या हातांत, तर कोकणच्या समुद्रकिनाऱ्यावरील परदेशांशी व्यापार बव्हंशी गुजराती, अरब इत्यादिकांच्या हातांत होता असे दिसते.[5]

उत्तरकालीन मराठी यादवांचे राज्य महाराष्ट्रात फार काळ टिकले नाही. शेवटचा यादव राजा

अनुक्रमणिका

रामदेव, ह्याच्या काळात मराठी संस्कृती थोडेसे बाळसे धरू लागली होती. ज्ञानेश्वरीसारख्या ग्रंथाची मराठीत निर्मिती झाली होती. तोच इ. स. १२९४ मध्ये उत्तरेकडून अल्लाउद्दीन खिलजीने महाराष्ट्रावर स्वारी केली आणि इथपासून महाराष्ट्राच्या इतिहासाला पुन: परकीय अमलाचे जुने वळण लागले. उत्तर यादवकालीन राज्याच्या कृपाछत्रामुळे येथील मराठी वाण्यांना व इतर मराठी छोट्या व्यापारी घटकांना व्यावसायिक संधी अधिक प्रमाणात मिळण्याची जी काही थोडीबहुत शक्यता निर्माण झाली होती, तीही नाहीशी होऊन यादवकाळानंतर मराठी समाजात एक दीर्घकालीन परकीय दास्यत्वाची व परागतीची स्थिती निर्माण झाली असावी. महाराष्ट्राच्या बहुतांश भागात मुसलमानी अंमल अव्याहतपणे सुमारे चारशे वर्षे टिकून होता ( साधारणपणे इ. स. १३०० ते १७०० ) व त्याचा परिणाम म्हणून त्या काळात सर्व सामाजिक, आर्थिक व राजकीय क्षेत्रांत महाराष्ट्रात मुसलमानी वर्चस्व टिकून राहिले. दख्खनी बहामनींच्या काळात चेऊल, दाभोळ, जुन्नर, दौलताबाद, पैठण ही महाराष्ट्रातील महत्त्वाची व्यापारी केंद्रे परकीय मुसलमान व्यापाऱ्यांच्या हातांत होती. पंधराव्या शतकाच्या अखेरीस नागोठणे, चेऊलसह कोकणचा समुद्रकिनारा गुजरातचा मुसलमान राजा महमुद बेगडा ह्याच्या ताब्यात गेला आणि शेवटी इ. स. १५०९ मध्ये चेऊल व कोकणकिनाऱ्यावरील अन्य व्यापारी केंद्रांवर पोर्तुगीजांचे वर्चस्व सुरू झाले.

सोळाव्या शतकात कोकणकिनाऱ्यावरील बंदरांत अनेक ठिकाणचे व्यापारी येत असत. त्यांत प्रामुख्याने अरब, तुर्की, इराणी, हिंदी मुसलमान, गुजराती, पोर्तुगीज हे असत. सतराव्या शतकाच्या सुरवातीपासून ह्यांत इंग्रज, फ्रेंच, डच इत्यादिकांची भर पडली. ह्या दूरगामी व मोठ्या प्रमाणावरील व्यापारी घडामोडी पश्चिम किनाऱ्यावर घडत असता खुद्द तिथलाच भूमिपुत्र जो कोकणी मराठी माणूस त्याला ह्यात कोठेच स्थान असल्याचे दिसत नाही. असलेच तर, व्यापारी गलबतांवर माल चढविणे व उतरविणे असले हमालीचे काम, किंवा फार तर छोट्या प्रमाणावर किनाऱ्यालगतचा थोडा व्यापार एवढ्यापुरते ते मर्यादित स्वरूपाचे असावे, असे दिसते.

सतराव्या शतकात सुरू झालेला भारताच्या पश्चिम किनाऱ्यावरील युरोपीय व्यापार व तदनुषंगिक होणारी भांडवली गुंतवणूक देशाच्या अर्थकारणात प्रभावी ठरू लागली होती व ह्या नव्या आर्थिक घडामोडींचा गुजराती व अन्य व्यापारी समाज फायदा घेऊ लागले होते. मराठी माणसे मात्र ह्या युरोपीय व्यापारी घडामोडीपासून बरीचशी असंबंधित, अलिप्त राहिली होती. त्यांच्या स्वत:च्या कोकणकिनाऱ्यावरसुद्धा त्यांना व्यापारी क्षेत्रात विशेष प्रवेश नव्हता आणि तीच स्थिती देशावरील अंतर्गत व्यापाराचीही होती. युरोपियांशी त्यांनी व्यापार करण्यासारखी खास काही वैशिष्टयपूर्ण परिस्थिती देशावर त्या काळी नव्हती. त्यामुळे युरोपियांच्या प्रवेशामुळे भारताच्या पश्चिम किनाऱ्यावरील व्यापारात जे एक ऐतिहासिक आर्थिक स्थित्यंतर घडून येऊ लागले होते, त्याच्याशी मराठ्यांचा फारच थोडा संबंध आला. त्या घडामोडीपासून प्रवृत्त होऊन आपणही अशा व्यापारी घडामोडीत भाग घ्यावा असे वाटण्याइतकी तत्कालीन मराठी समाजाची आर्थिक व्यवहारांची पातळी उंचावली नव्हती. इतिहासाचार्य राजवाड्यांच्या भाषेत सांगावयाचे, तर ह्या वेळचा मराठी समाज म्हणजे बव्हंशी एक आडमुठ्यांचा गठ्ठा होता. अशा समाजात व्यापारी वृत्तीसंबंधी चेतना निर्माण व्हावयाची तर काही महत्त्वाचे मूलभूत सामाजिक बदल घडून येऊन समाज सर्वार्थाने ढवळून निघणे व आर्थिकदृष्टया त्याचे उन्नयन होणे आवश्यक होते. स्वत:च्या प्रदेशात वाहतूक किंवा जलसिंचनास योग्य अशा मोठ्या नद्या नाहीत, प्रदेशाचा मुख्य भाग व समुद्रकिनारपट्टी यांना एकमेकांपासून अलग करणारा दक्षिणोत्तर पसरलेला सह्याद्री पर्वत, खडकाळ व शेतीच्या दृष्टीने दुय्यम किंवा तिय्यम दर्जाची जमीन, अशा तऱ्हेची आर्थिक-भौगोलिक परिस्थिती असताना तीत बदल घडून येणे अशक्यप्रायच होते. जर मूलभूत व मोठा आर्थिक-सामाजिक बदल घडून यावयाचाच असेल तर तो राजकीय स्थित्यंतराच्या मार्गे मात्र घडून येणे शक्य होते. तशी अनुकूल परिस्थिती महाराष्ट्रात १६-१७ व्या

अनुक्रमणिका

शतकात बनत चालली होती. आवश्यक जो बदल घडून यावयाचा तो मराठमोळ्या समाजमनाच्या ठेवणीला अनुरूप व त्या समाजातील अग्रगण्य घटकांना आकर्षित करील असा असणे आवश्यक होते.

मराठी लोकांना त्यांच्या स्वत्वाच्या नव्या जाणिवा करून देणारा, त्यांना विविध क्षेत्रांत नव्या वाटा दाखविणारा मूलगामी क्रांतिकारक बदल सतराव्या शतकाच्या मध्यापासून महाराष्ट्राच्या समाजजीवनात जोमाने घडून येऊ लागला होता. ह्या वेळी महाराष्ट्रातील मावळे, नाग, कोळी, भिल्ल यांसारख्या परंपरागत लढाऊ डोंगरी जमातींतील माणसे, तसेच खेड्यापाड्यांत, डोंगरकपाऱ्यांत राहून, बेभरवशी व आतबट्ट्याचा शेतीव्यवसाय करणारी कुणबी मराठी मंडळी निरनिराळ्या बहामनी राज्यांतील सैन्यांत मोठ्या संख्येने दाखल होऊन पोट भरू लागली होती. परकीय बहामनी व मुघली राज्यांच्या आश्रयानें, पण त्यांच्या उपयोगासाठी व पर्यायाने त्यांच्या मदतीसाठी महाराष्ट्रात जहागिरी व इतर रूपाने सामाजिक व राजकीय शक्तिकेंद्रे निर्माण झाली होती व होत होती. धार्मिक भेदभाव, सामान्य जनतेचे अपार दारिद्र्य, सैन्य जमा करण्यास व लढावयास अनुकूल अशी सामाजिक व आर्थिक परिस्थिती, स्वतःचा मुलूख डोंगराळ असणे, अशा सर्व मिश्रणानिशी तत्कालीन महाराष्ट्रजीवन खदखदत होते. त्या खदखदण्याचा स्फोटक उद्रेक म्हणजे महाराष्ट्रात सतराव्या शतकात घडून आलेली राज्यक्रांती होय.

मुख्यत्वे भौगोलिक कारणांमुळे आर्थिकदृष्ट्या अत्यंत मागास राहिलेल्या आपल्या स्वतःच्या प्रदेशात स्वराज्याची स्थापना करीत असता, मराठी लोकांनी बाहेरील प्रदेशात जाऊन तेथील संचित संपत्ती आपल्या प्रदेशात जमेल त्या मार्गाने आणणे अनिवार्य ठरले. तसेच स्वराज्यस्थापनेनंतर बाहेरील सुपीक व व्यापारीदृष्ट्या समृद्ध असे प्रदेश त्यांनी आपल्या ताब्याखाली आणणे हेही क्रमप्राप्तच होते. सतराव्या शतकाच्या अखेरीपासून मुघली साम्राज्याने प्रस्थापिलेल्या एकछत्री अमलाविरूद्ध भारतातील वेगवेगळ्या प्रदेशांत अशा तऱ्हेचे प्रादेशिक उठाव घडून येऊ लागले. त्या प्रयत्नांकडे त्या काळी भारतात ठिकठिकाणी सुरू झालेली ती राजकीय व आर्थिक विकेंद्रीकरणाची अटळ अशी महत्त्वाची प्रक्रिया होती अशा दृष्टिकोनातूनही पाहता येईल. वरवरचे तिचे स्वरूप मुघल साम्राज्याच्या केंद्रीकृत शक्तीविरुद्ध सशस्त्र प्रतिकार अशा राजकीय स्वरूपाचे होते. परंतु त्याच्या मुळाशी प्रादेशिक आर्थिक असमतोलत्वाची महत्त्वाची कारणेही निगडित असावीत, असे दिसते. मुघलांसारख्या एकछत्री साम्राज्यशाही अमलामुळे भारतात प्रादेशिक आर्थिक असमानता पोसल्या जाऊन वाढीस लागत होत्या. त्यामुळे नव्याने उदयास येऊ पाहणाऱ्या आर्थिक प्रादेशिक राष्ट्रिकांना त्या एकछत्री सत्तेशी आपल्या मगदुराप्रमाणे व राष्ट्रप्रकृतिधर्माप्रमाणे मुकाबला करणे व स्वतःच्या प्रगतीचा मार्ग सुकर करणे क्रमप्राप्त होते.

अशा परिस्थितीत, वर उल्लेख केल्याप्रमाणे, महाराष्ट्रात शिवाजी महाराजांनी सतराव्या शतकात परकीयांशी लढून मराठमोळ्या लोकांचे स्वतंत्र सार्वभौम राज्य स्थापिले. त्याचवेळी त्या लढ्यातून मराठ्यांचे आर्थिक, सांस्कृतिक, प्रादेशिकदृष्ट्या एकजिनसी असे एक नवीन राष्ट्र उदयास आले आणि महाराष्ट्रेतिहासाच्या एका नव्या कालखंडास सुरवात झाली.

ह्या नवराज्याच्या संस्थापनेमुळे, त्याविषयीच्या आधीच्या व नंतरच्या खटपटीमुळे आणि अनेक समरप्रसंगांमुळे महाराष्ट्रातील सामान्य माणसाचे जीवन अनेक प्रकारे व बऱ्याच प्रमाणात बदलले. महाराष्ट्रात घडून आलेल्या या राजकीय सामाजिक क्रांतीमुळे मराठीजनांना अनेकविध क्षेत्रांत पुढे सरसावण्यास नव्या संधी प्राप्त झाल्या. सावकारी व व्यापारी व्यवसायक्षेत्रांतील संधी ही त्यांपैकीच एक होय. सतराव्या-अठराव्या शतकात राजकीय क्रांती होऊन महाराष्ट्राच्या वाणिज्य इतिहासाला, एतद्देशीय मराठी लोकांना अनुकूल अशी जी नवी दिशा मिळण्याची शक्यता निर्माण झाली, ती सर्वस्वी तत्कालीन राजकीय व युद्धमय परिस्थितीतूनच उद्‌भवलेली होती, हे लक्षात घेतले पाहिजे. कारण त्यामुळे इथल्या वाणिज्य व्यवसायाच्या स्वरूपाला व प्रगतीला काही मर्यादाही पडणे स्वाभाविक होते. मराठ्यांच्या राज्यविस्ताराबरोबर त्यांची व्यवसायक्षेत्रेही वाढणार होती. परंतु केवळ राजकीय




आधारावर व्यवसायांची वाढ अवलंबून असल्यास राज्यसंकोचाबरोबर किंवा नाशाबरोबर त्या व्यवसायक्षेत्राचाही संकोच किंवा नाश होण्याचा धोका होता.

अशा महत्त्वाच्या जडणघडणीच्या त्या ऐतिहासिक काळात, म्हणजे १७–१८ व्या शतकात, महाराष्ट्रात असे कोणते योग्य समाजघटक होते की त्यांतून एक नवा व्यापारी-सावकारवर्ग निर्माण होऊ शकला असता ? ह्या शक्याशक्यतेच्या विषयाची चर्चा करताना महाराष्ट्रातील तत्कालीन विविध समाजघटक, त्यांचे सामाजिक स्थान, त्यांची कार्ये यांचा आपणास थोडक्यात का होईना, विचार करावा लागेल.

## संबंधित समाज-घटक

महाराष्ट्राच्या नागरी व ग्रामीण भागांत शिवपूर्वकाळीही किंबहुना त्याच्याही बऱ्याच पूर्वीपासूनही, लहान प्रमाणावर वाणिज्य वा तत्सम व्यवसायावर उपजीविका करणारे लोक होते हे तत्कालीन साहित्यावरून व उपलब्ध कोरीव लेखांवरून कळते. बलुतेदारांत सोनारासारखे घटक होते; पण बलुतेदार सोनार जरी नाणी पारखताना किंवा दागिने करताना सोने हाताळत असे, तरी तो स्वतः मात्र सामान्यपणे गरीब व्यावसायिकच राहिला होता.

बलुतेदारीबाहेरील घटकांत खेड्यातील वाणी मोडत असत. परंतु त्यांच्यांत द्रव्यसंचय करण्याची कुवत फारशी नसावी. एक तर खेड्यातील बहुजनसमाजाच्या वर्चस्वामुळे कर्जवसुलीच्या बाबतीत त्यांना फार कडकपणे वागता येण्यासारखे नव्हते. आणि दुसरे व त्याहून महत्त्वाचे कारण म्हणजे महाराष्ट्राच्या बहुतांश भागात– एक वऱ्हाड प्रदेश सोडल्यास– कापूस, नीळ, तंबाखू, अफू यांसारखी निर्यातक्षम व अधिक लाभदायक व्यापारी पिके सहसा कुठे लागवडीखाली नसत. त्यामुळे शेतीतून निर्माण होणाऱ्या अतिरिक्त उत्पन्नाचे प्रमाणही मुळातच जेमतेम असे. तेव्हा शेतीच्या अतिरिक्त उत्पन्नातील फारसा मोठा वाटा व्यापाराच्या योगे संबंधित खेड्यातील वाण्यापर्यंत जाऊन पोहोचण्याची शक्यता मुळातच फार कमी होती.

यासंबंधीचा समाजातील आणखी एक महत्त्वाचा उपलब्ध घटक म्हणजे शेटे व महाजन यांचा. इतिहासाचार्य राजवाडे यांच्या मते[१] यादवकालीन मराठी समाजात शेटे व महाजन यांजसारखे एतद्देशीय वाणिज्य घटक अस्तित्वात होते; परंतु त्यांचा उद्योग नंतर गुजरात व मारवाडहून आलेल्या वाण्यांनी बळकाविला. म्हणजे, राजवाड्यांच्या मते गुजराती व मारवाडी बनिये महाराष्ट्रात मुसलमानी राजवटीत आले आणि त्यांच्या वर्चस्वामुळे मराठी शेट्यांना व महाजनांना आपले व्यवसाय गुंडाळून शेतकी व्यवसायाकडे वळावे लागले. राजवाड्यांनी आपल्या या मताच्या पुष्टयर्थ ऐतिहासिक पुरावा कुठे दिलेला नाही. उलट, पुणे दप्तरातील उपलब्ध पुराव्यावरून असे दिसते, की गुजरात मारवाडमधून बनिये महाराष्ट्रात विशेष प्रमाणात येऊ लागले ते अठराव्या शतकापासून. शिवाय शिलालेख, ताम्रपट इत्यादींतील उपलब्ध साहित्यातून दुसरे असे दिसते, की तेरा ते सतराव्या शतकातही, म्हणजे यादवोत्तर मुसलमान कालातही शेटे व महाजनांची संस्था महाराष्ट्रात सर्वत्र होतीच. उपलब्ध असलेल्या बाराव्या शतकापासूनच्या ठिकठिकाणच्या मराठी कोरीव लेखांत 'सेठी', 'महाजन', 'म्हातारा', 'सोवनी' 'कोठारी', 'वाणी' इत्यादींसंबंधाचे उल्लेख आढळतात.[२] यावरून एकंदरित असे दिसते, की यादवकाली व नंतर मुसलमानकालातही महाराष्ट्रात मराठी समाजात शेटे व महाजन ही संस्था सर्वत्र अस्तित्वात होती. ती नष्ट झाली नव्हती, पण त्या संस्थेचे स्वरूप बलुतेदारी वतनदारीसदृश होते. त्या संस्थेच्या अंगभूत मर्यादांमुळे व निम्नस्तरीय आर्थिक उलाढालीमुळे मराठी शेटे–महाजन मंडळींतून मोठ्या प्रमाणात खास व्यापारी-सावकारवर्ग निर्माण होण्याची शक्यता मात्र कमी होती. सतराव्या शतकात महाराष्ट्रात स्वराज्याची स्थापना झाली त्यापूर्वीही शेटे व महाजन हे गावातले देशक किंवा गाव-अधिकारी मानण्यात येत व राजसत्तेचीही त्यांना तशी मान्यता असे. देशमुख, देशकुलकर्णी, पाटील, खोत, वर्तक इत्यादींप्रमाणे ते गावातले मिरासदार असत. पण त्यांचे जे मुख्य काम–बाजारपेठा वसविणे, वजने मापे इत्यादींवर देखरेख ठेवणे वगैरे, ते इतर व्यावसायिक वतनांप्रमाणे वतनानेच ठरत असे.

एखादी विशिष्ट वस्तू किंवा सेवा गावात किंवा संबंधित प्रदेशात विकणे अशासाठी व्यावसायिक

वतने असत. वतनदारविक्रेत्याला किंवा कारागिराला त्याच्या वतनपत्रात उल्लेखिल्याप्रमाणे गावातील इतर वतनदारांना व गावअधिकाऱ्यांना आपल्या वस्तू व सेवा नेमून दिलेल्या प्रमाणात विनामूल्य द्याव्या लागत. उदाहरणार्थ, विडचाची पाने विकण्याचे वतन मिळविलेल्याने नेमून दिलेल्या विशिष्ट गावात तो व्यवसाय करावयाचा, त्याबद्दल सरकारला दरवर्षी ठराविक रक्कम द्यावयाची, रोज गावच्या पाटलाला, समजा की, पन्नास पाने, कुलकर्ण्याला तीस पाने इत्यादी विनामूल्य पुरवावयाची वगैरे. म्हणजेच ज्याप्रमाणे बलुतेदाराची सेवा त्याचे बलुते गावकरी ठरवीत त्याप्रमाणे व्यावसायिक वतनदाराच्या सेवा–सवलती वगैरे सरकारकडून सविस्तर ठरविल्या जात. व्यापारउदीमासाठी काही मर्यादेपर्यंत या वतनसंस्थेचा –यात शेटे–महाजनांची संस्थाही आली –उपयोग होई. पण त्यातील संकुचित कार्यक्षेत्र, चढाओढीचा अभाव, मालाच्या किंवा सेवेच्या गुणवत्तेला गौण स्थान इत्यादी अंगभूत मर्यादांमुळे संबंधित व्यवसायांचा मोठ्या प्रमाणावर विस्तार होऊ शकत नसे किंवा त्याची गुणवत्ताही वाढत नसे.

सारांश, बलुतेदारी पद्धतीतून काय किंवा शेटे-महाजन व इतर वतनदारी व्यवसायीपद्धतीतून काय, व्यापारी-सावकारवर्गाचा नवीन प्रकार निर्माण होण्यासारखी परिस्थिती नव्हती. त्यासाठी जास्त स्वतंत्र व मोकळेपणाने व्यवहार करू शकणाऱ्या समाजघटकांची आवश्यकता होती.

गावातील वाण्यांना आपल्या व्यवसायाच्या बाबतीत त्यामानाने जास्त मोकळीक होती, असे म्हटले पाहिजे. तथापि, त्यांच्यावरही गावकीच्या नियमांची व मानपान हक्कादिकांची काही ना काही बंधने असतच. मात्र वतनी व्यावसायिकांपेक्षा कमी म्हणावयाची. तत्कालीन शहरातील मराठी वाण्याचे सामाजिक स्थान मात्र बेताचेच असावे असे दिसते. कोकण आणि देशावरील काही भागात वैश्य वाणी असत. ते मांसमासळी खात, दारू पीत. हिंदू समाजातील त्यांच्या खालच्या दर्जाचे ते एक लक्षण होते. कोकणात प्रादेशिक वाणीजमाती होत्या. सावंतवाडीचे कुडाळी, संगमेश्वरचे संगमेश्वरी, साताऱ्याकडून आलेल्या पाटणचे पाटणे इत्यादी. पण तेही गरीब वर्गात मोडत व त्यांचा सामाजिक दर्जाही बेताचाच होता. देशावरून पाटणे जे कोकणात गेले ते व्यापारउदीमासाठी नसून १३९६–१४०८ च्या दुर्गादेवी दुष्काळाच्या तडाख्यातून स्वतःचा जीव वाचविण्यासाठी, असे उल्लेख आहेत. वाण्यांतील आणखी एक प्रकार म्हणजे देशावरील कुणबी वाण्यांचा. मुळातून ते शेतकरीवर्गातील होते. थोर मराठी संतकवी तुकाराम महाराज (१६०७ ते १६४९) यांचा या संदर्भात उल्लेख करता येण्यासारखा आहे. ते कुणबी वाणी होते व वंशपरंपरेने त्यांच्याकडे महाजनपणही आले होते. असे असूनही आर्थिकदृष्ट्या ते गरीबच होते. दुष्काळामुळे त्यांच्यावर अनेक आपत्ती आल्या. दुष्काळात बायको मेली, गुरेढोरे मेली आणि इतर किडुकमिडूकही गेले. एकंदरीने मराठी वाणी–मग ते खेड्यांतील असोत वा मोठ्या गावांतील असोत –फारसे धनवान नव्हते, असे दिसते.

या ठिकाणी ऐतिहासिक कालातील व्यापार-व्यवसायासंबंधीच्या दोन बाबींचा उल्लेख करणे उचित ठरेल. पहिली अशी, की सर्वसामान्य किराणा-भुसार व्यापार जरी मराठी वाणी करीत, तरी विक्री व सेवेचा बराचसा व्यवहार संबंधित उत्पादक किंवा कारागीरच करीत, असे उपलब्ध ऐतिहासिक उल्लेखांवरून आढळून येते. तत्कालीन अर्थव्यवस्थेस ते धरूनच होते. उदाहरणार्थ, स्वतः शिंपी कापड व कपडे विकीत, कासार तांब्या-पितळेची भांडी विकीत, सणगर कांबळी विकीत, तर तेली तेल विकीत वगैरे. म्हणजेच उत्पादक किंवा कारागीर हे विक्रेत्याचे जोडकामही करीत. तत्कालीन अर्थव्यवस्था अप्रगत अवस्थेत असल्याने उत्पादन व वितरण या दोन क्रिया वेगवेगळ्या व्यावसायिकांनी करण्याची जरुरी नसे; एवढेच नव्हे, तर तसे करणे किफायतशीरही झाले नसते. दुसरी महत्त्वाची बाब व जिचा थोडा सविस्तर विचार इथे करावयाचा आहे, ती म्हणजे, किराणा-भुसार व्यापारसुद्धा जातीने वाणी असलेले लोकच केवळ करीत असे नव्हे. ब्राह्मणासारख्या इतर जातीतील लोकही हा व्यवसाय करीत. तसेच, महाराष्ट्रात पूर्वीपासून शेटे व महाजन मंडळी हीसुद्धा वेगवेगळ्या जातींची असत हेही इथे लक्षात घेण्यासारखे आहे.[८]

ब्रिटिशपूर्व कालात भारतातील जातिव्यवस्थेमुळे व्यवसायाची निवड किंवा बदल यांच्या बाबतीत सामाजिक स्वातंत्र्य नव्हते अशी एक मोघम कल्पना आपल्यापैकी अनेकांच्या मनांत दृढमूल झालेली असते. कदाचित मनुस्मृतिसारख्या ग्रंथांतून प्रतिपादलेल्या आदर्श समाजरचनेच्या नियमांवरून अशी समजूत बलवत्तर होण्यास मदत झाली असेल. या समजुतीत अजिबात तथ्य नाही, असे नव्हे. परंतु या विषयासंबंधी अधिक तपशिलात जाऊन ऐतिहासिक सत्यता पडताळून पाहण्याची मात्र आवश्यकता आहे, असे वाटते. भारतात ऐतिहासिक कालात निरनिराळ्या व्यवसायांत, प्रदेशांत, नगरांत, व्यवसायांची निवड किंवा त्यांत बदल होत असत का ? होत असल्यास ते समाजातील कोणत्या स्तरांत, किती प्रमाणात होत असत, का व कसे होत असत इत्यादी एक स्वतंत्र संशोधनाचा विषय होऊ शकेल. त्या विषयीची त्रोटक चर्चाही प्रस्तुत विषयाच्या कक्षेबाहेरची आहे.

तथापि, यासंबंधीच्या महाराष्ट्रातील परिस्थितीबद्दल असे दिसते, की येथे बऱ्याच जातींतील लोकांना विविध तऱ्हेचे व्यवसाय उपलब्ध असत. इतर जातींतील लोकांपेक्षा ब्राह्मण जातीतील मंडळी अधिक प्रमाणात अनेकविध व्यवसाय करू शकत असत. बव्हंशी ब्राह्मणांनीच लिहिलेल्या व अर्थ लावलेल्या स्मृतिग्रंथांतील नियमांनुसारही ब्राह्मणांना अनेक व्यवसायक्षेत्रे उपलब्ध होती. ते जातिव्यवस्थेच्या अग्रभागी असल्याने, अस्वच्छ मानलेले व्यवसाय सोडल्यास, इतर व्यवसायांच्या बाबतीत त्यांना फारसा कुठे मज्जाव नसे. आळतेकरांनी ‘ राष्ट्रकूट आणि त्यांचा काल ’ या आपल्या इंग्रजी ग्रंथात यासंबंधी भरपूर ऐतिहासिक व धर्मशास्त्रीय दाखले दिले आहेत. सतराव्या-अठराव्या शतकातही हीच स्थिती अस्तित्वात होती, असे दिसते. धर्मशास्त्रावरील आधीच्या ग्रंथकारांनी ब्राह्मणांना व्यापार, सावकारी, शेती, सैनिकी व्यवसाय इत्यादींबद्दलही–म्हणजे क्षत्रिय व वैश्यांची कामे करण्याबद्दलही–मुभा दिली होती; पण ती आपद्धर्म म्हणून. उदरनिर्वाहासाठी केवळ तसाच कठिण प्रसंग आला तर केवळ अपवाद म्हणून. परंतु, नंतरच्या स्मृतिकारांनी ( सुमारे काल इ. स. ७५० ते १००० ) अर्थार्जनासाठी अनेकविध व्यवसाय ब्राह्मणांनी, केवळ आपद्धर्म म्हणून नव्हे तर, केव्हाही, अवश्य करावेत असे म्हटले आहे. कुसीद; म्हणजे सावकारी तर ब्राह्मणांनी अवश्य करावी असे स्मृतिकारांनी स्पष्टपणे म्हटले आहे.[१]

महाराष्ट्रात ठिकठिकाणी ब्राह्मण मंडळी खेड्यांतून बलुतेदार म्हणून भटाचे काम करीत. अनेकजण स्वतःची शेती करीत व गुरेढोरे बाळगूनही राहत. वाचन, कारकुनी, हिशेब इत्यादींचे शिक्षण घेतलेले ब्राह्मण लेखनिक, फडणीस, मुत्सद्दी, व्यापारी, सावकारी इत्यादी व्यवसायक्षेत्रांत वावरू शकत. महाराष्ट्रात ब्राह्मणांना मराठा, कायस्थ इत्यादी जातींप्रमाणे राजकीय दृष्टयाही महत्त्वाचे स्थान होते. राजकीय, प्रशासकीय व सैनिकी क्षेत्रांत दक्षिण भारतात तरी दीर्घ काळापासून, म्हणजे सातवाहनांच्या काळापासूनसुद्धा ( २५० इ. स. पू. ते २५० इ. स. ) महत्त्वाच्या पदांवरून ब्राह्मणांनी कामे केलेली आढळून येतात. या विषयाच्या आणखी एका महत्त्वाच्या अंगाचा या संदर्भात इथे उल्लेख करणे आवश्यक आहे. ऐतिहासिक काळात ब्राह्मणांनी जरी वेगवेगळे व्यवसाय अनुसरले, तरी त्या त्या व्यवसायानुसार त्यांच्यांत तितक्या उपजाती पडल्या नाहीत, हे लक्षात घेण्यासारखे आहे. ब्राह्मण कुटुंबात एका पिढीचा व्यवसाय आधीच्या पिढीच्या व्यवसायापेक्षा वेगळा असू शके. इतकेच काय, एकाच व्यक्तीच्या आयुष्यात आधी एक व्यवसाय तर नंतर दुसरा भिन्न क्षेत्रातील व्यवसाय, असे घडू शके. एकाच ब्राह्मण कुटुंबात एका व्यक्तीचा व्यवसाय एक, तर दुसरीचा आणखीन एकादा वेगळा, असेही घडे.

सारांशाने सांगावयाचे तर, सतरा-अठराव्या शतकात ज्या वेळी महाराष्ट्रात एतद्देशीय खास असा व्यापारी व सावकारवर्ग उदयास येण्याची शक्यता निर्माण झाली, त्यावेळी ज्यातून तो निर्माण व्हावयाचा त्यात, त्यातल्या त्यात योग्य असे, शेटे, महाजन, वाणी, वतनदारीवर व्यवसाय करणारे, विक्रेते, कारागीर, उत्पादकवजा विक्रेते, ब्राह्मण असे प्रमुख विविध आर्थिक-सामाजिक घटक अस्तित्वात होते. ह्यांतील कोणते घटक अधिक यशस्वी ठरले व ते का हे कळण्यासाठी तत्कालीन

अनुक्रमणिका

मराठी राज्याची प्रशासकीय व आर्थिक कारभार-पद्धती कशी होती हेही पाहणे आवश्यक ठरेल.

### मराठी राज्याचे आर्थिक प्रशासन

अठराव्या शतकातील मराठी राज्याची अर्थ-व्यवस्था मुख्यत: दोन पायांवर आधारलेली होती. एक म्हणजे मुलकी महसूलव्यवस्था व दोन, लष्करी अर्थव्यवस्था. राज्यातील लहानमोठ्या वेगवेगळ्या आकाराच्या महसुली प्रदेशांतील सरकारी वसुली-साठी जे अधिकारी नेमलेले असत त्यांना कमाविस-दार म्हणत. सरकारी अर्थव्यवस्थेच्या विशिष्ट पद्धतीमुळे, जी मुळात आर्थिक-भौगोलिक परि-स्थितीमुळे व बेभरवशी शेतकी उत्पन्नामुळे बव्हंशी निर्माण झाली होती, त्या पद्धतीमुळे कमाविस-दारांना आपल्या महसूलप्रदेशासंबंधी सरकारने ठरवलेल्या वसुलाइतक्या रकमेचा भरणा सरकारी तिजोरीत प्रत्यक्ष वसूल होण्यापूर्वी म्हणजे वर्षाच्या सुरवातीसच आगाऊ भरावा लागे. काही वेळा एकाहून अधिक वर्षासाठीही असे आगाऊ भरणे करावे लागत. ह्या पद्धतीमुळे, अर्थातच, सरकारची वार्षिक उत्पन्नाची जमा अधिक खात्रीशीरपणे व नियमितपणे होऊ शके. परंतु ह्या व्यवस्थेने, अनि-यमित वसुलीच्या अनिश्चिततेला मात्र कमाविस-दारांना तोंड द्यावे लागे. असे सरकारी तिजोरीत आगाऊ भरलेले महसुलाचे पैसे म्हणजे पर्यायाने कमाविसदारांनी सरकारला दिलेले ते कर्जच असे. कारण, यावर त्यांना व्याजही मिळे. ह्या पद्धतीचा एक महत्त्वाचा परिणाम असा झाला, की कमाविसी व सावकारी असा जोड-व्यवसाय सुरू होण्यास मदत झाली. कमाविसदार प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष साव-कारी करू लागले तसे सावकारही कमाविसीकडे वळू लागले. अशा पद्धतीने दिलेल्या महसुली कर्जाव्यति-रिक्त अनेक कमाविसदार वेळोवेळी इतर शासकीय कामासाठीही सरकारला कर्जे देऊ लागले.

सरकारी सारा आणि इतर कर वगैरेंची वसुली रोख पैशात किंवा धान्य, मीठ, तेल, तूप इत्यादी जिन्नसरूपांतही केली जाई. अशा तऱ्हेने जमा झालेले जिन्नस सरकार आपल्या किल्ल्यावरील नोकरांना पगाराचा भाग म्हणून वाटीत असे. शिवाय जमा झालेल्या जिन्नसांचा काही भाग ठिकठिकाणच्या सरकारी दुकानांतून विक्रीसाठीही ठेवण्यात येई. तसेच राज्यकर्ते गिऱ्हाइकाच्या नात्याने प्रत्यक्षपणे किंवा मध्यस्थांमार्फत खुल्या बाजारात मोठ्या प्रमाणात वस्तू विकत घेत. कारण शासकीय कामासाठी विविध तऱ्हेचे जिन्नस वरचेवर मोठ्या प्रमाणात सरकारला लागत असत.

मराठी राज्यातील दुसरा महत्त्वाचा अर्थव्यव-हार हा युद्धामुळे निर्माण झालेला होता. बाहेरील प्रदेशात लष्करी मोहिमा पार पाडण्यासाठी,







सुरुवातीस खर्च करण्यासाठी म्हणून, मोठ्या प्रमाणावर पैसा लागे. तो बराचसा आपल्याच लोकांकडून गोळा करणे भाग होते. अशा वेळी केवळ सरकारी क्षेत्रातील कमाविसदार किंवा इतर महसूलयंत्रणेवर विसंबून भागत नसे. खाजगी क्षेत्रातूनही पैसा उभा करणे आवश्यक ठरे. बाहेरील प्रदेशातून पैसा आणला, की मोहिमांसाठी काढलेली कर्जे फेडता येत असत.

तथापि, युद्धे व लष्करी मोहिमा आर्थिकदृष्ट्या मराठ्यांना नेहमीच लाभदायक ठरत असे नाही. हाती घेतलेल्या मोहिमांमुळे अनेकदा प्रचंड आर्थिक तोटेही सोसावे लागत. युद्ध जिंको की हरो, सैन्यावरचा आवश्यक खर्च टाळता येत नसे. बाहेरील जिंकलेल्या प्रदेशात विविध तऱ्हेच्या जमाबंदीची चोख व्यवस्था लावण्यास आवश्यक असलेली प्रशासकीय निपुणता व शिस्तबद्धता, आणि ती राबविण्यास आवश्यक ती शासकीय कार्यक्षमता मराठ्यांत होतीसे दिसत नाही. शासकीय परंपरेचा अभाव हे एक त्याचे महत्त्वाचे कारण असू शकेल. युद्धात ठरलेल्या कराराप्रमाणे बाहेरील प्रदेशातून येणारी खंडणीही त्यांच्याकडे नियमित व ठरलेल्या प्रमाणात येत नसे, असे दिसते. तिच्या वसुलीसाठी पुन्हा त्यांना नवीन मोहिमा काढाव्या लागत. अशा मोहिमांतसुद्धा, लुटीच्या प्रसंगीही, नादिरशहासारखी मराठ्यांना कधी अब्जावधी रुपयांची संपत्ती लुटणे जमले नाही. किंबहुना प्रचंड लुटीच्या तंत्रात मराठे सर्वसामान्यपणे मागासलेलेच राहिले. त्यांच्या लुटी, सामान्यपणे, भुरट्या स्वरूपाच्या असत. लूटमार करणारे म्हणून देशभर आपले नाव मात्र त्यांनी बद्दू करून घेतले, ही गोष्ट खरी.

अशा परिस्थितीत स्थानिक पातळीवर छोटेमोठे सावकार महाराष्ट्रात निर्माण होणे व त्यांनी युद्धकर्त्यांना युद्धासाठी कर्जे देणे हे क्रमप्राप्त होते. घेतलेले कर्ज सरकारी तिजोरीतून वेळेवर परत करणे मराठी राज्यकर्त्यांना बरेचदा जमत नसे. मग कर्जफेड वेगवेगळ्या प्रकारे करावी लागे. जुने देणे भागविण्यासाठी नवे कर्ज काढीत. उदाहरणार्थ, पुणे दप्तरखान्यात उपलब्ध असलेल्या वार्षिक तजुम्यांवरून ( सरकारी जमाखर्चाच्या एकत्रित करून लिहिलेल्या हिशोबी कागदांवरून ) असे दिसते, की सरकारने आपले जुने कर्ज फेडण्यासाठी १७६३–६४ साली २४ लाख रुपयांचे नवे कर्ज काढले होते. पुढील वर्षी याच कारणासाठी ३६ लाख रुपयांचे कर्ज काढले होते वगैरे. एखाद्या लष्करी मोहिमेसाठी कर्ज देणाऱ्या सावकाराला ते परस्पर फेडून घेण्यासाठी एखाद्या प्रदेशाचे कमाविसी अधिकार देत. एक उदाहरण घेऊन सांगावयाचे तर १७३३–३४ मध्ये सरकारने राजापूरच्या मोहिमेसाठी खंडोजी गोगावलेकडून दरमहा तीन टक्के दराने कर्ज घेतले होते आणि मोहीम यशस्वी झाल्यानंतर कर्जफेड करावयाची होती. सरकारला परतफेड करणे न जमल्यास त्याबद्दल योग्य त्या उत्पन्नाचा प्रदेश गोगावलेस कमाविशीने देण्याचे कलम करारातच घातले होते.[१०] लहानमोठ्या खंडण्यांच्या थकलेल्या बाक्या वसुल करण्यासाठी लष्करी मोहिमा काढीत आणि त्या मोहिमांच्या खर्चासाठी पुनः कर्ज काढीत. असे हे लोकअर्थव्यवस्थेचे एक अनुत्पादक दुष्टचक्र निर्माण झाले होते.

सरकार जी कर्जे काढी, त्यावर दरसाल साधारणपणे १५ टक्के व्याज त्यांचे सावकार आकारीत. काही विशेष बाबतीत व्याजाचा दर दरसाल ३६ टक्क्यांपर्यंतही गेलेला आढळतो. यामुळे प्रशासकीय व्यवहारासाठी किंवा सैन्यउभारणीसाठी व लष्करी मोहिमांसाठी कर्जाऊ रकमा देणे किंवा उधारीवर सामान देणे हा एक मोठा किफायतशीर व्यवसाय महाराष्ट्रात अठराव्या शतकात बनून राहिला. पण त्यात धोका व अनिश्चिततेचे प्रमाणही बरेच होते. धोका अशासाठी होता की जोवर मराठ्यांचे राज्य विस्तारत होते तोवर खंडणी वा अन्य उत्पन्नाच्या स्वरूपात बाहेरील प्रदेशातून कसे का होईना, थोडाफार प्रमाणात पैसे येत असत व दिलेल्या कर्जाची फेड कमीजास्त प्रमाणात होत असे. परंतु मराठी राज्याचा विस्तार थांबल्यास किंवा त्याचा संपूर्ण नाश झाल्यास युद्धकर्त्यांनी सैन्यासाठी काढलेल्या कर्जांची परतफेड होणे संभवनीय नव्हते आणि नंतर येणाऱ्या सत्तेनेही अशा कर्जफेडीची जबाबदारी स्वतः स्वीकारणे शक्य नव्हते. मराठी राज्याच्या उत्कर्षाच्या काळात त्या राज्याचा संपूर्ण पराभव होऊन वेगळीच परकीय सत्ता त्या जागी येईल व







आपण दिलेल्या कर्जाची वसुली कदापि होऊ शकणार नाही अशी कल्पना तत्कालीन सावकारांना असंभवनीय वाटणे स्वाभाविक होते व त्यामुळेच ते आवश्यक तो व्यावसायिक धोका पत्करावयास तयार होते. या व्यवसायातील अनिश्चिततेचा भाग असा होता, की मराठ्यांच्या मोहिमा कधी यशस्वी होत तर कधी अयशस्वी. त्यामुळे दिलेले कर्ज ठराविक मुदतीत वसूल होईलच याची शाश्वती नसे. तथापि, कर्जाची सव्याज परतफेड ह्या नाहीतर त्या मोहिमेनंतर अवश्य होईल असा भरवसा मात्र त्यांना वाटत असावा. एकंदरीने सर्व गोष्टींचा विचार करता व मिळणारा व्याजाचा दर लक्षात घेता, व्यवसायास आवश्यक तो धोका व तत्संबंधी अनिश्चितता पत्करूनही तो चालविणे त्यांना किफायतशीर वाटत असावे, यात शंका नाही.

राजकीय घडामोडींमुळे अठराव्या शतकात, महाराष्ट्राच्या अर्थकारणात अशा तऱ्हेने एक नावीन्यपूर्ण आणि महत्त्वाचा बदल घडून येऊ लागला. या बदललेल्या सार्वजनिक अर्थव्यवहारासाठी किमान आवश्यक अशी पायाभूत अर्थसंरचना व आवश्यक ते विविध आर्थिक सुविधासमुच्चय व आवश्यक त्या आर्थिक संस्था निर्माण होणे व वाढीस लागणे अपरिहार्य झाले. ज्या राजकीय–आर्थिक बदलामुळे अशी अनुकूल परिस्थिती निर्माण झाली ती युद्धमय स्थिती कायमची टिकुन राहणे नवीन आर्थिक-मध्यस्थ वर्गाच्या दृष्टीने अर्थात जरुरीचे होते. त्या वर्गातील मंडळींना नवीन अर्थकारणासाठी आवश्यक व परस्परपूरक असे विविध अर्थव्यवहार करावयाचे होते. त्या वर्गात कमाविसदार, वसुली अधिकारी, हिशेबनीस, सावकार, व्यापारी, कर्जे व लष्करी मोहिमांना लागणारी साधनसामग्री रोख किंवा उधारी स्वरूपात मिळवून देणारे मध्यस्थ, सैन्याबरोबर कर्जवसुलीसाठी जाणारे सावकार किंवा त्यांचे प्रतिनिधी इत्यादी अनेक प्रकार होते. आणि अशा परिस्थितीत, मराठ्यांच्या युद्धप्रधान अर्थव्यवस्थेत, राज्यकर्त्या व्यक्तीशी अधिक संबंधित असलेल्या आर्थिक मध्यस्थांना इतरांपेक्षा व्यावसायिक संधी अधिक प्रमाणात मिळणे स्वाभाविक आणि क्रमप्राप्त होते.

## व्यापारी–सावकारवर्गाचा उदय : सावकार

महाराष्ट्रातील विशेषतः देशावरील खेड्यांतून सारावसुलीचे व कुलकर्णिकाचे काम पूर्वीपासून आणि मुसलमानी अमलातही, बव्हंशी देशस्थ ब्राह्मणांकडेच असे. मराठी सत्ता उदयास येऊ लागल्यावरही स्वाभाविकपणे सारावसुली व जकातवसुली यांच्या कमाविसींची कामे देशस्थ ब्राह्मण मंडळी करू लागली. त्यांतील काहींनी छोट्यामोठ्या गावांत हळूहळू जम बसवीत सावकारी व्यवसायास सुरवात केली असावी. अशा व्यावसायिकांच्या याद्या निरनिराळ्या प्रसंगी व कारणारणाने तयार झालेल्या आहेत व त्या ऐतिहासिक कागदपत्रांतून पाहावयास मिळतात. त्यांतील उपलब्ध असलेल्या तपशीलावरून इतिहासाच्या अभ्यासकांना काही अनुमाने काढता येण्यासारखी आहेत.

१७२५ साली पेशवे बाजीरावांना पुण्याची जहागीर मिळाली आणि साधारणपणे तेव्हापासून मराठी राज्यकारभाराची राजधानी पुण्यास आली असे म्हणावयास हरकत नाही. मराठी राज्याचा विस्तार होऊ लागला आणि परिणामतः पुणे शहराचीही वाढ होत गेली. १४ जानेवारी १७३९ रोजी संक्रांतीच्या दिवशी पेशव्यांनी पुण्यात ज्यांना तिळगूळ वाटला अशा व्यक्तींच्या नावाची यादी पुणे दप्तरखान्यात उपलब्ध आहे. पुण्याची जहागीर पेशव्यांना मिळाल्यावर १३-१४ वर्षांनंतरची ही यादी आहे. तीत सावकारांची चवदा नावे आली आहेत. प्रा. धनंजयराव गाडगिळांनी यापूर्वी तिचा उल्लेख केला आहे.[११] त्या यादीत मोघे, कांबरस, नाईक, कडू, घम, दशपुत्रे, भिडे, कानडे, अनगळ, तांबवेकर, दादाभाई, शास्त्री, कोंडा जोशी, बर्वे अशी नावे आली आहेत. त्यांत बरीचशी नावे देशस्थ ब्राह्मणांची असल्याचे दिसते. १७४० च्या सुमारास, सरकारला कर्जे पुरविणारे सुमारे दीडशे छोटेमोठे सावकार पुण्यात व्यवसाय करीत असावेत असे पेशवे दप्तरातील प्रकाशित निवडक उताऱ्यांत आलेल्या उल्लेखांवरून दिसते. काही सावकार प्रत्यक्षपणे सरकारास कर्जे देत तर काही कुणा मोठ्या सावकाराच्या मार्फत, किंवा तेव्हाच्या भाषेत सांगावयाचे तर, कोणा सावकाराच्या









अनुक्रमणिका

'गुजारतीने' कर्जे देत. हिशेबी कागदपत्रांतून वरचेवर उल्लेख होतो अशी पेशवेकालीन पुणे सावकारांची घराणी म्हणजे : अनगळ, ओंकार, करजे, गद्रे, गाडगीळ, गुजर, गुणे, गोसावी, चिपळोणकर, जोशी, तांबवेकर, तुळशीबागवाले, थत्ते, दातार, दामले, दीक्षित-पटवर्धन, पटवर्धन, पाठक, बिवलकर, भावे, भिडे, भोकरे, मघवे, मोघे, रास्ते, लेले, वैद्य, श्रोत्री, साने इत्यादी होत.

सावकारांत अनेक चित्पावन व देशस्थ ब्राह्मण-घराणी असत. तसेच कऱ्हाडे ब्राह्मण, शिंपी, सोनार, मराठा, शेणवी इत्यादींतही महत्त्वाची सावकारी-व्यापारी मंडळी असल्याचे दिसते. पुणे शहरातील सावकारांच्या संख्येत चित्पावनांचे प्रमाण व त्यांचे व्यावसायिक वर्चस्व अठराव्या शतकाच्या उत्तरार्धात वाढू लागले असे दिसते. स्वतः पेशवे हे भट घराण्यातील चित्पावन ब्राह्मण असून त्यांचे अनेक सरदार व जहागिरदारही चित्पावन होते. पेशवेकालीन सावकारांत चित्पावनांचे महत्त्व वाढण्यास ते एक महत्त्वाचे कारण होते हे उघड आहे. पेशवे व त्यांचे सरदार यांना लष्करी मोहिमांसाठी व नेहमीच्या राज्यकारभारासाठीही वारंवार पैसे लागत. अशा नडीच्या वेळी सर्व संबंधित पक्षात परस्परांसंबंधी विश्वास असणे आवश्यक होते. त्यामुळे राज्यकर्ते, युद्धकर्ते व व्यापारी सावकार यांचे जास्त जवळचे संबंध येत राहणे स्वाभाविक होते.

मराठी समाज अनेक जाती व जमातींनी युक्त असा होता, पण त्यांतील सर्वजण एकाच प्रादेशिक आर्थिक संस्कृतीचे घटक होते. त्यामुळे अठराव्या शतकात त्यांतील बहुतेक सर्व कर्तबगार लोकांना विविध क्षेत्रांत कमीजास्त प्रमाणात अनुकूल संधी उपलब्ध होत होत्या. उदाहरणार्थ, होळकर हे मुळातील धनगर जमातीचे, पण नंतर एका मोठ्या राज्याचे प्रमुख झाले. शिंद्यांचीही तीच तऱ्हा. पेशवे दरबारातील मुख्य न्यायाधीश रामशास्त्री प्रभुणे हेही बालपणी एका सावकाराकडे सामान्य नोकरच होते. मोरशेट करजे हे सुरवातीस साताऱ्याला लहानसे दुकानदार होते, पण नंतर पेशवेसरकारला वेळोवेळी कर्जपुरवठा करणारे एक मोठे सावकार झाले. खाजगी पुरोहिताचे काम करणाऱ्या अनेक ब्राह्मणांनी आपल्या दक्षणा व इतर उत्पन्न साठवून सावकारी सुरू केली व त्यांतील काही मध्यम प्रतीचे तर काही मोठे सावकार बनले. मुत्सद्देगिरी, युद्धकौशल्य, कारकुनीचे उत्तम ज्ञान अशांच्या जोरावर सामान्यांतून वर आलेले काही ब्राह्मण पुढे सेनापतीही बनले. भिन्न आर्थिक स्तरांवर असलेल्या व भिन्न व्यवसायांत गुंतलेल्या, पण एकाच जातीच्या असलेल्या कुटुंबांत परस्परांत वैवाहिक संबंध जमून येणे शक्य असे व तसे ते जमतही असत आणि तसे झाल्यास त्यात काही खास विशेष घडले असे वाटण्याचे कारण नसे. ह्याही परिस्थितीमुळे एकाच जातीच्या घटकात व्यवसायभिन्नता निर्माण होण्यास मदत होत असे. वर एके ठिकाणी याच संदर्भात म्हटल्याप्रमाणे इतर जातिजमातींच्या तुलनेने ब्राह्मणांतील व्यवसायांतराचे प्रमाण अधिक असावे असे दिसते. सावकारवर्गात महत्त्वाचे घटक जरी ब्राह्मण असले तरी ब्राह्मणात व्यापारी ब्राह्मण, सावकारी ब्राह्मण अशा पोटजाती पडल्या नाहीत. त्याचप्रमाणे, महाराष्ट्रात सैनिकी पेशा करणाऱ्यांचीही वेगळी जात निर्माण झाली नाही. एक तर सैनिक इतरही व्यवसायांशी, उदाहरणार्थ, शेतीशी, निगडित असत. आणि दुसरे म्हणजे सैनिकी पेशात मराठा, मावळे, ब्राह्मण, धनगर, महार अशा विविध जातींचे लोक गुंतलेले असत.

पारंपरिक पुरोहितपणाच्या व्यवसायात गुंतलेले काही भटभिक्षुक सोडले तर सर्वसामान्यपणे असे दिसते, की १८व्या शतकातील मराठी ब्राह्मणवर्ग साधारणतः इहवादी वृत्तीचा असावा. पैसे मिळवून देणारे असे अनेक व्यवसाय असत, की ते अंगीकारण्याच्या बाबतीतही प्रस्थापित सामाजिक नैतिक मूल्ये ब्राह्मणांच्या आड फारशी येत नसावीत. याबाबत, जमेल ते व्यवसाय आणि मिळवता येईल त्या व्यवसायांतून पैसा हा अर्थवादच तत्कालीन मराठी ब्राह्मणांच्या बाबतीतही प्रभावी असावा. त्यामुळे शेतकरी, आचारी, पाणके, स्वयंपाकी, जासूद, कारकून, सैनिक, सावकार, दुकानदार, व्यापारी, वैद्य असे विविध तऱ्हेचे व्यवसाय करणाऱ्या ब्राह्मणांसंबंधीचे असंख्य उल्लेख ऐतिहासिक कागदपत्रांतून आढळतात. ब्रह्मेन्द्रस्वामी धावडशीकरांसारखा ( १६४९ ते १७४५ ) धार्मिक वृत्तीचा

देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण, स्वतःला मिळालेली दाने व देणग्या शिल्लक टाकीत पुढे एक मोठा सावकार झाला आणि पेशव्यांना व इतर सावकारांना कर्जे देऊ लागला हे सर्वज्ञात आहे. त्याने दिलेली कर्जे लाखांच्या घरात गेली होती.

महाराष्ट्रात गुजराती व इतर बाहेरील व्यापाऱ्यांचा, केव्हापासून व कसकसा प्रवेश होत गेला ह्यासंबंधीचे ऐतिहासिक संशोधनही मराठ्यांच्या व्यापारी इतिहासाच्या संदर्भात उपयुक्त आहे. यासाठी तत्कालीन याद्या, हिशेबाचे कागद, सरकारकडे केलेले विनंतीअर्ज, संबंधित पत्रव्यवहार इत्यादी अस्सल ऐसिहासिक साधने पाहावी लागतील. उदाहरणार्थ, १७५५-५६ साली पुण्यातील एका सावकारी पेढीशी, शहरातील ज्या इतर महत्त्वाच्या सावकारांनी व्यवहार केला होता त्या ७५ नावांपैकी बारा नावे गुजराती सावकारांची दिसतात.[१२] सुमारे तेरा वर्षांनंतरच्या म्हणजे १९६८-६९ च्या आणखी एका उपलब्ध यादीत[१३] पेशवेसरकारला कर्ज दिलेल्या नऊ सावकारी पेढ्यांची नावे आढळतात. त्या सर्वांनी मिळून त्या वेळी साडे तेरा लाख रुपयांचे कर्ज सरकारला दिले होते. त्यापैकी त्या यादीतील केवळ दोन सावकारांनी – परांजपे आणि काबरस यांनी – सुमारे साडेसात लाख रुपयांचे म्हणजे निम्म्याहून अधिक कर्ज दिले होते. त्या एकूण नऊ नावांत फक्त एक बिगर-मराठी नाव आढळते. ते म्हणजे, वाघोजी बगाडिया या गुजराती सावकाराचे. त्याने सरकारला फक्त ५३०२ रुपये इतकी रक्कम त्या प्रसंगी कर्जाऊ दिली होती.

या संबंधात पुण्यापेक्षा थोडी वेगळी परिस्थिती थोड्या आधीच्या काळी सातारला असल्याचे एका वेगळ्या यादीवरून दिसते. युद्धानंतर झालेल्या दोन राज्यांमधील तहातील कलमांत खंडणीसंबंधीचे कलम बहुधा असे. आकारलेली खंडणी काही नेहमीच तिथल्या तिथे सर्वच्या सर्व रोख वसूल करणे शक्य नसे. अशा वेळी सावकारामार्फत हुंड्यांच्या स्वरूपात त्यांची वसुली होई. १७५३-५४ साली श्रीरंगपट्टणवर मराठ्यांनी दहा लक्ष नऊशे रुपयांची खंडणी आकारली होती व साताऱ्यातील बारा सावकारी पेढ्यांच्या नावाने ती रक्कम हुंड्यांच्या रूपाने मिळविली होती.[१४] या यादीतील बारा सावकारांच्या नावांत, नऊ नावे गुजराती सावकारांची, व दोन कन्नड लिंगायतांची आढळून येतात. म्हणजे, निदान या यादीप्रमाणे साताऱ्यातील बिगरमराठी सावकारांचे प्रमाण १७५० च्या सुमारास मराठी सावकारांच्या मानाने अधिक असण्याची शक्यता आहे. परंतु अशा खंडणीसंबंधीच्या व इतर हुंड्यांचा व्यवहार नंतर जेव्हा पुणे शहरातील सावकारांशी होऊ लागला, तेव्हा तत्संबंधी याद्यांत मराठी सावकारांची नावे बऱ्याच अधिक प्रमाणात आढळतात. मराठ्यांची घटनात्मक राजधानी असलेल्या साताऱ्यास मराठी ब्राह्मणसावकारांची संख्या पेशवाई पुण्यापेक्षा तुलनेने कमी असावी व त्यामुळे गुजराती सावकार तिथे तुलनेने अधिक संख्येत असावेत असे दिसते. शिवाय पेशव्यांनी १७६१च्या पानिपतच्या पराभवानंतरच मुख्यत्वे आपली दृष्टी दक्षिणेकडे वळविली आणि खंडणी व इतर उत्पन्नाच्या उगवणीसाठी कर्नाटकावरील मोहिमा नियमितपणे सुरू केल्या. म्हणून कर्नाटकाशी मराठी सावकारांचा हुंडीव्यवहार सामान्यपणे १७६०च्या दशकापासून वाढू लागला असे दिसते. १७७०च्या दशकाच्या अखेरीपर्यंत पुण्यातील गुजराती सावकारी पेढ्यांची संख्या कमी असल्याचे ऐतिहासिक कागदपत्रांवरून दिसते. त्यानंतर बहुधा गुजराती सावकारांचे महत्त्व पुणे व महाराष्ट्राच्या इतर व्यापारी केंद्रांत हळूहळू वाढू लागले असावे. या संबंधात एक उदाहरण इथे नमूद करण्यासारखे आहे. १७९५ मध्ये पुण्याजवळील जेजुरीच्या मराठी वाण्यांनी पेशवे सरकारला, एक अर्ज करून विनंती केली की, "मौजे मजकुरीची वाणीपणाची दुकाने बहुत दिवस आहेत. वगैरे वाणीही आहेत. त्यास आमचे म्हणणे साहेबांसी आहे की मौजे मजकुरी गुजराचे दुकान आहे ते नसावे. गुजरास दुकान देऊ नये. त्याबाबत आम्ही साहेबास नजर रु. १०० सेंबर देऊ हा कतबा लिहून दिल्हा"![१५] यावरून पुण्याजवळील एका महत्त्वाच्या बाजारपेठेत पारंपरिक वाणीपणाने व्यवहार करणाऱ्या मराठी वाण्यांना स्वतंत्रपणे व्यवहार करणाऱ्या व बाहेरून आलेल्या गुजराती वाण्यांशी स्पर्धा करणे व्यावसायिक दृष्टया हानीकारक वाटत असावे, असे दिसते.








अठराव्या शतकाच्या उत्तरार्धात पेशव्यांना व इतर मराठी सरदारांना युद्धे अधिकाधिक खर्चिक होऊ लागली असावीत. याला दोन महत्त्वाची कारणे होती. ती म्हणजे, एक तर सुमारे १७४० पासून पुणे व आसपासच्या मंडींतील वस्तूंचे बाजारभाव सतत वाढत चालले होते.[१६] त्यामुळे युद्धखर्च वाढत जाणे अपरिहार्य होते. आणि, दुसरे असे की, राज्यविस्ताराच्या धोरणामुळे स्वतःच्या डोंगरी प्रदेशातील जुन्या गनिमी पद्धतीची कमी खर्चाची युद्धनीती मराठ्यांनी सोडली होती. त्यांना, त्यामुळे, महाराष्ट्राबाहेरील प्रदेशात पायदळ व स्वारानिशीच्या मैदानावरील खर्चिक युद्धनीतीचा अवलंब करावा लागत असे. केवळ वाहतुकीवर व घोड्यांच्या खरेदीवरही मराठ्यांना सतत व वाढता खर्च करावा लागत असे. अधिकाधिक युद्धखर्च म्हणजे सावकारी कर्जावर अधिकाधिक विसंबणे हे ओघानेच आले. पुणे ही केवळ पेशव्यांचीच राजधानी नसून अठराव्या शतकात साऱ्या मराठी घटकराज्यांचे ते राजकीय व आर्थिक केंद्र बनले होते. त्यामुळे बाहेरील अनेक मराठी सरदारांना व सेनापतींना लष्करी मोहिमा व इतर कारणांसाठी पुण्यामधील सावकारांशी व व्यापाऱ्यांशी कर्जासाठी व वस्तूंच्या खरेदीसाठी जवळचा आर्थिक संपर्क ठेवणे आवश्यक होते. शिवाय, बाहेरील मराठी घटकराज्यांनी पुण्यातील पेशवेसरकारला या ना त्या प्रकारे आपल्या उत्पन्नाचा काही ठराविक भाग द्यावा असे बहुतेक बाबतीत करारमदार असत.[१७] या व अशा इतर कारणांमुळेही पुणे व इतर शहरांत परस्परांत आर्थिक देवघेव बऱ्याच प्रमाणात होत असे. परिणामतः अठराव्या शतकाच्या उत्तरार्धात पुणे हे भारतातील हुंडीव्यवहाराचे एक महत्त्वाचे केंद्र बनले. उदाहरणार्थ, पुण्यातील एका दीक्षित-पटवर्धनांच्या सावकारी पेढीचा हुंडीचा व्यवहार वाराणसी, बऱ्हाणपुर, जालनापुर, औरंगाबाद, नासिक, थळनेर, पैठण, मुंबई, नारायण पेठ, शिवपट्टण इत्यादी केंद्रांशी होत असल्याची नोंद त्यांच्या हिशेबी वह्यांतून सापडते. तुळशीबागवाल्यांच्या पेढीकडे १७६९ साली केवळ एका महिन्यात देशातील वेगवेगळ्या ठिकाणांहून दीड लाख रुपये किंमतीच्या हुंड्या आल्या होत्या. त्यांतील ५०,००० रु. ची एक हुंडी सुरतेच्या नागर लक्ष्मीदासच्या पेढीकडून आलेली होती.[१८]

पुणे व अन्य मराठी शहरांत पैशाच्या देवघेवीचे व्यवहार लहानमोठ्या प्रमाणात बऱ्याच संख्येत होत असल्याने सावकार, उपसावकार व त्यांचे मध्यस्थ इत्यादींच्या संख्येत भर पडून महाराष्ट्रात अठराव्या शतकात सावकारी व्यवहार करणारा एक महत्त्वाचा खास नवा वर्ग उदयास आला.

युद्धकर्त्यांतर्फे कर्जे उभारणे, विविध युद्धोपयोगी साहित्य बाजारातून उधारीने आवश्यक त्या प्रमाणात गोळा करणे वगैरे कामे करणारे जे मध्यस्थ असत ते ब्राह्मण, मराठा, प्रभु इत्यादी विविध जातींचे असत. मध्यस्थाचे काम जबाबदारीचे, नाजूक व कौशल्याचे असे. ते काम करणारा हरहुन्नरी, लोकांचा विश्वास संपादन करू शकणारा व गोडबोल्या असावा लागे. सरकार, संबंधित सेनापती, पेठेतील सावकार व व्यापारी या सर्वांशी त्याचे संबंध सलोख्याचे व विश्वासाचे असावे लागत. सैन्याच्या मोहिमेसाठी पैशांची कर्जे व उधारीवर वस्तू जमविणे किती कौशल्याने, निर्धाराने व सर्वसंबंधितांचा विश्वास संपादून करावे लागे यासाठी उदाहरण म्हणून रावजी आपाजी प्रभू यांचा यासंबंधीचा १७७० सालचा आत्मवृत्तांत बघण्यासारखा आहे.[१९]

राज्यकर्ते व सेनापती मोठाली कर्जे घेत व अनेक सावकारांशी त्यांचा नात्यागोत्याचा वा अन्य जवळचा संबंधही असे. परंतु यामुळे धनकोंनी ऋणकोंच्या राजकारणात लुडबूड केली किंवा स्वतःला मोठे राजकीय अधिकारपद मिळावे म्हणून अयोग्य खटपट केली असे सहसा घडले नाही. ब्रह्मेन्द्रस्वामी धावडशीकरांचा उल्लेख या संदर्भात वर आलाच आहे. त्यांनी पेशव्यांना व इतरांना कर्जे दिली व कोकण व इतर राजकारणाविषयी आपले मत प्रतिपादले. पण त्याचेही स्वरूप मर्यादित होते. या बाबतीत दुसरे उदाहरण सांगता येण्यासारखे म्हणजे बाबुजी नाईकांचे. पेशवाईच्या सुरवातीच्या काळात बाबुजी नाईक सावकार हे एक खास प्रकरण होऊन गेले. पेशव्यांचे ते जवळचे आप्त होते. तसेच व्यवसायाने सावकारी व्यवहार करणारे आणि सेनापतीही होते,



अनुक्रमणिका

पहिल्या बाजीरावांच्या मृत्यूनंतर (एप्रिल १७४०) बाबुजी नाईकांनी आपण पूर्वी सरकारला दिलेल्या व वसूल न झालेल्या कर्जाच्या बळावर पेशवेपदावर आपला हक्क सांगितला होता. रघुजी भोसलेंनी याबाबत बाबुजी नाईकांचा पक्ष उचलून धरला होता. परंतु बाबुजी नाईकांच्या खटपटीला अखेर यश आले नाही, मराठी सावकारवर्गात बाबुजी नाईकांसारखी महत्त्वाकांक्षी व राजकारणी मंडळी फारशी झाली नाहीत असेच म्हणावे लागते.

### व्यापारी

येथवर सावकारवर्गाच्या उदयासंबंधाने आपण चर्चा केली. सावकारवर्गाच्या जोडीने व्यापारी-वर्गही महाराष्ट्रात अठराव्या शतकात तत्कालीन विशिष्ट राजकीय–आर्थिक परिस्थितीमुळे उदयास येऊ लागला होता. कर्जाच्या बरोबरीने सरकारला अनेक कारणांसाठी–प्रशासकीय, लष्करी, राजनैतिक, सणसमारंभ अशा व इतर कारणांसाठी–विविध जिन्नसा सदैव लागत असत. त्यांचा सरकारला पुरवठा होण्याचे मुख्य मार्ग म्हणजे शेतसाऱ्याच्या रूपाने पिकातील काही भागाची वसुली, जकातीच्या रूपाने वसुल होणारा व वाहतुकीत गुंतलेला काही माल, वगैरे होते. याशिवाय रोख किंवा उधारीने प्रत्यक्ष बाजारातून खरेदी केलेले जिन्नस असतच. सरकारच्या खरेदीव्यवहारात कापड–चोपड हा सर्वांत प्रमुख जिन्नस होता. पेशवेसरकारच्या हिशेबी कागदपत्रांत जिन्नसांच्या आयव्ययाचे सरकारी हिशेब, 'ऐनजिनसी' या नावाखाली स्वतंत्रपणे नोंदून ठेवले जात. ते अभ्यासले असता ऐनजिनसी व्यवहारात कापडाला किती महत्त्वाचे स्थान होते याची कल्पना येते. पुणे दप्तरखान्यातील घडणी दप्तरातील रुमाल क्रमांक ७४८ मध्ये उपलब्ध असलेली काही वर्षांसंबंधीची या विषयीची आकडेवारी उदाहरणादाखल पाहण्यासारखी आहे :

पेशवेसरकारने कापड व इतर जिन्नसा उधारीवर खरेदी केल्या त्यांचा रुपयांत हिशेब.

| वर्ष | कापड | इतर जिन्नसा |
|---|---|---|
| १७६३–६४ | ३,१६,४०२ | १६,००४ |
| १७६५–६६ | १,५०,७१२ | २८,७४२ |
| १७६७–६८ | ३,३२,५१२ | १७,२०० |
| १७६९–७० | २,१७,६०० | ९,८४८ |
| १७७१–७२ | ५,१३,४३७ | १२,३९२ |

वरील आकडेवारीवरून इतर जिन्नसांच्या मानाने कापडाची उधारीवर खरेदी सरकार किती मोठ्या प्रमाणावर करीत असे, याची कल्पना येते.

उधारीच्या जोडीला रोखीनेही व्यवहार होत असे. शेतसारा, जप्ती इत्यादींच्या रूपाने धान्यादी जिन्नस सरकारकडे मोठ्या प्रमाणावर जमा होत. यांतील अतिरिक्त जिन्नस बाजारात विकून जे पैसे येत तेही आवश्यक त्या वस्तू रोखीने खरेदी करण्यासाठी सरकारला पुनः वापरता येत. अशा रोखीने केलेल्या कापडखरेदीचेच एकाद्या वर्षीचे उदाहरण घेता येईल. केवळ १७६३–६४ या एका वर्षी पेशवेसरकारने पंचवीस लाखांहून अधिक रुपये किंमतीचे कापड रोखीने बाजारातून खरेदी केल्याचे दिसते.[२०] कापडखरेदीचे हिशेबाचे कागदपत्र पाहिले तर हे लक्षात येते, की अठराव्या शतकात महाराष्ट्रात व विशेषतः पुण्याच्या पेठेत कापडव्यापाऱ्यांची संख्या बरीच असावी. शिवाय दुसरे असे, की सरकारने केलेल्या अनेक खरेद्या अगदी लहान प्रमाणातही झालेल्या असत.

पैशाचा कर्जव्यवहार करणारे अनेक सावकार, कापडव्यापाराचा व्यवसायही करीत असत. त्यामुळे पैशांच्या कर्जाच्या याद्यांत येणारी सावकारांची अनेक नावे तीच उधारीने कापड पुरविणाऱ्या व्यापाऱ्यांच्या याद्यांतही आढळतात. १७६८-६९ साली पेशवेसरकारने ज्यांच्याकडून उधारीवर कापडाची खरेदी केली अशा तीस कापडव्यापाऱ्यांची एक यादी उपलब्ध आहे.[२१] यात सरकारने पूर्वी ज्यांच्याकडून पैसे कर्जाऊ घेतले होते अशा सावकारांची नावे, आता कापडव्यापाऱ्यांची नावे म्हणून आली आहेत. त्यांतील बारा नावे चित्पावन ब्राह्मणांची दिसतात, नऊ देशस्थ ब्राह्मणांची आहेत आणि इतरांत मराठा, शिंपी वगैरे आहेत. आणि ध्यानात घेण्यासारखी एक गोष्ट अशी, की यांत एकही बिगर-मराठी किंवा गुजराती नाव नाही. या तीस व्यापाऱ्यांकडून एकूण सुमारे तीन लाख रुपये किंमतीचे कापड सरकारने उधारीवर खरेदी केले. ह्या यादीतील काही तपशील पाहण्यासारखा आहे : रामचंद्र नाईक परांजपे ह्यांच्याकडूनची खरेदी सर्वांत मोठी म्हणजे रु. ५४,७३२ ची आहे. काबरस, भिडे, पारगावकर, ताटके, वानवळे

अनुक्रमणिका

इत्यादींकडूनच्या खरेद्या रु. १०,००० ते ३०,००० पर्यंतच्या आहेत आणि काही व्यापाऱ्यांकडून सरकारने फारच छोट्या, म्हणजे रु. १००० हून कमी किंमतीच्या खरेद्या उधारीवर किंवा सरकारी उधारीखात्यावर म्हणून केल्या आहेत. उदाहरणार्थ, तांबेकर यांजकडून रु. ८६२ रु. चे दिनानाथ महाजन यांजकडून ६७५ रुपयाचे, आणि गोपाळ कानडे यांजकडून ५७३ रुपयाचे कापड सरकारने आपल्या उधारीखात्यावर घेतले आहे.

अशीच एक १७७३ सालासंबंधीची सरकारी कापडखरेदीची यादी मिळते. त्यात पुणे बाजारपेठेतील ७१ कापडव्यापाऱ्यांची नावे आली आहेत.[२२] त्यांतील फक्त दोन नावे बिगर-मराठी किंवा गुजराती असल्याचे दिसते. एक, छबीलदास बऱ्हाणपूर आणि दोन, माधवदास गोडीदास यांचे.

काही सावकारांच्या व व्यापाऱ्यांच्या याद्यांचा वर उल्लेख केला आहे. त्यांच्यांतील उपलब्ध माहितीच्या मर्यादा जमेस धरूनही असे म्हटले पाहिजे, की अशा याद्यांत उल्लेख केलेल्या नावांवरून, रकमांवरून, तारखांवरून व त्यावेळच्या राजकीय व आर्थिक घडामोडींवरून आपणास तत्कालीन महाराष्ट्रातील सावकारी व व्यापारी व्यवसायाचा प्रकार, त्याचा आवाका, त्याच्या प्रगतीची दिशा इत्यादींबद्दल बराच बोध होऊ शकतो.

या व अशा अन्य याद्यांवरून असे दिसते की, अठराव्या शतकाच्या उत्तरार्धात मोठ्या संख्येने मराठी व्यापारीवर्ग, विशेषतः कापडव्यापारांत गुंतलेला, निर्माण झाला होता व महाराष्ट्रातील बाजारपेठेत तो प्रभावीपणे व्यवहार करीत होता. गुजरात्यांसारखे बाहेरचे व्यापारी, संख्येने त्या काळात महाराष्ट्रात, विशेषतः पुणे व आसपासच्या बाजारपेठेत, कमी प्रमाणात होते. मराठी व्यापाऱ्यांत चित्पावन ब्राह्मण व त्या खालोखाल देशस्थ ब्राह्मण प्रमुख घटक होते.

मराठी सावकारांनी वेळोवेळी दिलेल्या कर्जाचे जे हिशेबाचे कागदपत्र उपलब्ध आहेत ते पाहता एक गोष्ट प्रामुख्याने लक्षात येते ती, म्हणजे अठराव्या शतकात एकाही मराठी सावकाराने पाच लाख रुपयांइतकीही रक्कम कधी एकरकमी कर्जाऊ दिल्याची नोंद आढळत नाही. सर्वसामान्यपणे एकरकमी मोठा कर्जाऊ आकडा म्हणजे २०,००० ते ५०,००० रुपयेपर्यंतचा. दुसरे असे, की पेशवेसरकारने सावकारांकडून ज्या रकमा कर्जाऊ घेतल्या त्या अनेकदा एक हजार रुपयाच्या आतल्याही असत. ह्याचाच अर्थ असा की, अठराव्या शतकाच्या उत्तरार्धात सरकारी अल्प कर्जव्यवहारांची, त्याचप्रमाणे छोटेखानी मराठी सावकारांची संख्या बरीच मोठी असावी. परंतु त्यातून, परप्रांतांत काही ठिकाणी झाले तसे कुणी जगत्सेठ किंवा वीरजी व्होरांसारखे कोट्यधीश धनाढ्य सावकार महाराष्ट्रात निर्माण झाले नाहीत. त्या तोलामोलाचे श्रेष्ठी किंवा व्यवहारी निर्माण होऊ शकतील अशी आर्थिक संरचना आणि आवश्यक त्या दर्जाच्या व तितक्या किफायतशीर व्यापारी घडामोडी तत्कालीन महाराष्ट्रात होत नसत, असेच म्हणावे लागते.

पुणे येथील सावकारांचे व व्यापाऱ्यांचे ज्याप्रमाणे पेशवेसरकारशी व इतर संबंधितांशी आर्थिक व्यवहार चालत, तसे ते इतर बाहेरील मराठी सत्ताधाऱ्यांशीही असत. त्याचप्रमाणे केवळ सरकारी स्तरावर नव्हे तर खाजगी स्तरावरही कर्जाचो देवाणघेवाण, रोखीने वा उधारीने जिन्नसांची खरेदीविक्री इत्यादी व्यवहार होत असत. सरकारी व इतर दप्तरखान्यांत उपलब्ध असलेल्या यासंबंधीच्या कागदपत्रांवरून त्या व्यवहाराच्या प्रकाराबद्दल हुंडणावळीचे दर, व्याजाचे दर, पेढ्यांचे अंतर्गत व्यवस्थापन इत्यादींबद्दलही बरीच उपयुक्त माहिती मिळू शकते.

अठराव्या शतकात पुणे व आसपासच्या प्रदेशात मोठ्या प्रमाणात कर्जांची देवाण-घेवाण, जिन्नसांची खरेदी-विक्री इत्यादींनी युक्त असा अपूर्व आर्थिक बदल मराठी समाजात घडून येत होता. त्या प्रक्रियेचा गुणक परिणामही इतर आर्थिक क्षेत्रांत व आसपासच्या प्रदेशात पसरणे अर्थव्यवहाराला धरून होते.

पुण्यातील बाजारपेठेशी व्यवहार करणाऱ्या बाहेरील मराठी व्यापाऱ्यांची संख्या आणि त्यांच्या व्यवहाराचे प्रमाण कालानुसार वाढत असावे. हे बहुधा छोटे व्यापारी किंवा वाणी असत. या व्यापाऱ्यांनी सरकारला केलेल्या विनंतीअर्जांत किंवा सरकारने त्यांना लिहिलेल्या उत्तरांत, वा सनदांत त्यांचा उल्लेख 'गरीब साहुकार' असा होत असे. या छोट्या

अनुक्रमणिका

व्यापाऱ्यांना वा गरीब साहुकारांना व्यावसायिक उत्तेजन देण्यासाठी सरकार करात, जकातीत वगैरे काही काळाकरिता, सूट किंवा माफी देत असे. अशा वेळी यासंबंधीचे सरकारी धोरण सनदांतून सहज व्यक्त होत असे. उदाहरणार्थ, इ. स. १७६३-६४ ची एक सनद पहा : पुणे व जुन्नर प्रांतात "वाणी उदमी देशातून तेल, तूप, गूळ व हळद ऐसा जिन्नस घेऊन येतात त्यास सांप्रत या जिनसांची अमदानी जाहली पाहिजे... तरी सदरहू जिनसांस दसऱ्यापर्यंत जकात सुदामत शिरस्त्यापैकी निमे घेत जाणे व निमे माफ करीत जाणे." [२१] तंबाखू, मीठ, नारळ, तूप इत्यादी जिन्नसांच्या विक्रीचे वेगवेगळ्या प्रदेशांबाबत ठराविक काळातील मक्ते देण्यात येत. आणि असे व्यापारी मक्ते महाराष्ट्रातील वेगवेगळ्या भागांत मुसलमानासुद्धा अनेक जातींचे व्यापारी लोक योग्य ती परवानारक्कम भरून मिळवीत. १७६३-६४ मध्ये महादाजी नारायण व सदाशिव रघुनाथ कमाविसदार जकात प्रांत पुणे व जुन्नर यांनी सरकारला अर्ज केला होता, की "पुण्यात वाण्याउदम्यांची अमदानी होऊ लागली त्यास कोणाकोणापासून जकात घ्यावी न घ्यावी येविशीची आज्ञा जाहली पाहिजे." त्यास सरकारने यासंबंधीचे आपले धोरण तपशीलवार जाहीर केले[२४] सरकारी दुकाने चालवणारे छोटे व्यापारी असत. त्यांना सुरवातीचे भांडवल म्हणून सरकारकडून साधारणपणे दरसाल बारा टक्के व्याजाने पैसे कर्जाऊ मिळत असे आढळून येते.[२५]

अठराव्या शतकाच्या उत्तरार्धात महाराष्ट्रातील वेगवेगळ्या भागांतून छोटे व्यापारी, वाणी, कारागीर इत्यादी विविध तऱ्हेचे व्यावसायिक पुण्याकडे मोठ्या संख्येने स्थलांतर करू लागले. तसे ते महाराष्ट्राच्या बाहेरूनही येऊ लागले. त्यामुळे त्यांना सामावून घेण्यासाठी शहरात नवनवीन पेठा वसवाव्या लागल्या. पेठेतील व्यापारी-कारभारावर सरकारची देखरेखही आवश्यक असे. त्यामुळे पारंपरिकपणे शेटेपण व महाजनपण करणाऱ्या मंडळींना नव्याने महत्त्व आले व त्यांचे कामही वाढले. परिणामतः शेटे-महाजनकीचे काम करण्यासाठी या क्षेत्रात नव्यानेच इतर क्षेत्रांतील माणसेही पुढे येऊ लागली व यासंबंधी सरकारशी करारमदार करू लागली. अठराव्या शतकाच्या सुरवातील पुण्यात केवळ पाच पेठा होत्या. त्यांची संख्या वाढत जाऊन, त्या शतकाच्या अखेरीस शहरात अठरा पेठा झाल्या. आणि त्या वसवण्यात सरकारी कारभारी व शेटे-महाजनांबरोबर सावकार, मक्ता घेऊन बाहेरील कारागीर आणून पुरविणारे मध्यस्थ, इमारतीच्या बांधकामाचे मक्तेदार इत्यादी अनेकांचा सहभाग घडू लागला. पुण्याप्रमाणेच महाराष्ट्रातील इतर नगरांकडेही नव्याने स्थायिक होण्यासाठी व्यापाऱ्यांचा व कारागिरांचा ओघ सुरू झाला आणि पेशवेसरकारकडून त्याला प्रोत्साहन म्हणून नवागत सावकारांना, व्यापाऱ्यांना जकातमाफी करणे, मानाची वस्त्रे देणे, पालखी इत्यादी मानाचे हक्क देणे, गावात राहण्यास मोफत वाडा देणे, किंवा कोठार बांधण्यास मोफत जमीन देणे इत्यादी हक्क-सवलती दिल्या जाऊ लागल्या.[२६]

## ठेकेदार

सरकारची, तसेच पेशव्यांची व इतर सरदार जहागिरदारांची खासगीकडील, विविध तऱ्हेची कामे असत, ती त्या त्या कामांचे स्वतंत्र ठेके देऊन करवून घेतली जात. अशा तऱ्हेने ठेक्याने दिलेल्या कामासंबंधीचे पत्रव्यवहार, हिशेबी कागद इत्यादी मोठ्या संख्येने उपलब्ध आहेत. विविध तऱ्हेच्या कामांसाठी त्या त्या क्षेत्रातली अनुभवी व व निष्णात ठेकेदार व्यावसायिकांची आवश्यकता असे. उदाहरणार्थ, इमारती बांधणे, पाट बांधणे-वाड्यात रोजच्या भोजनाची, पाटपाण्याची व्यवस्था ठेवणे, दिवाबत्तीची सोय करणे, फुलांचा पुरवठा करणे इत्यादी; तसेच, टपालसेवा, खाणी, नदीवर नावा चालवून वाहतूक करणे, तोफांचे गोळे बनविणे, अग्निबाण बनवणे, कागद, शाई तयार करणे व पुरवणे इत्यादी अनेक कामांचे दिलेले ठेके व त्यांचे हिशेबी कागद मोठ्या प्रमाणात सापडतात. त्यांत येणारी जवळजवळ सर्वच नावे मराठी आहेत, आणि ती अनेक जातींतील आहेत. सरकारचे अठरा तऱ्हेचे कारखाने चालविण्यासाठी व त्यांत काम करण्यासाठीही सोनार, लोहार, तांबट, सुतार, विणकर, शिपी इत्यादी विविध व्यावसायिकांची व कारागिरांची गरज असे. खाजगी कामांसाठी लोकांकडूनही अशा कारागिरांना मागणी असे. कारागिरांना मजुरी देऊन जसे काम करून






घेतले जाई तसे ठेके देऊनही काम दिले जाई. अशा छोटयामोठ्या अनेक ठेकेदारांचा एक नवा वर्गही महाराष्ट्रात, विशेषतः पुण्यासारख्या शहरात अठराव्या शतकात तयार झालेला दिसतो. त्याची कित्येक उदाहरणे मराठी ऐतिहासिक कागदपत्रांतून मिळतात.

एकंदरीने पाहता असे दिसते, की महाराष्ट्रात अठराव्या शतकात जो आर्थिक बदल घडून येत होता, त्या प्रक्रियेचा गुणक परिणाम विविध आर्थिक क्षेत्रांत व निरनिराळ्या प्रदेशांत पसरत होता. तथापि, त्या बदलाचा मुख्य गाभ्याचा भाग हा पैशाचे हस्तांतर, आर्थिक मध्यस्थी, व्यापार, सेवेची ठेकेदारी इत्यादींचा होता. त्या बदलात औद्योगिक स्थित्यंतराचा भाग अल्प होता असे दिसते. जो काही आर्थिक बदल घडून येत होता, त्याची सर्व मदार मुख्यत्वे राजकीय पायावरच आधारलेली होती. परंतु राजकीय पायाची मजबुती आणि स्थिरता तरी त्या काळात कितीशी होती ?

शत्रूकडून शहरे व खेडी लुटली जात. पुणे शहराचेच उदाहरण घ्यायचे तर ते १७६३, १७९७ व १८०२ या वर्षी यथेच्छ लुटले गेले होते. इतकेच काय, अनेकदा स्वकीय सैन्यापासूनही आपल्या पिकांचे, मालाचे, संपत्तीचे संरक्षण लोकांना करावे लागे. स्वकीय सावकारांवर सक्ती करून, प्रसंगी त्यांचा छळ करूनही, मराठा सैन्याने त्यांच्याकडून पैसे उकळल्याची उदाहरणे काही कमी सापडत नाहीत.

तथापि, हे असे काही प्रकार वगळल्यास, सर्वसामान्यपणे विचार करता असे म्हणता येईल, की अठराव्या शतकाच्या उत्तरार्धात महाराष्ट्रात तरी मराठी अमलामुळे सर्वसाधारण सुरक्षिततेची परिस्थिती निर्माण झाली होती आणि बव्हंशी राजकीय कारणांमुळेच महाराष्ट्रसमाज त्या काळी आर्थिक क्षेत्रात काही अंशी प्रगती करू लागला होता.

प्रा. धनंजयराव गाडगिळांनी म्हटले आहे, की महाराष्ट्रात एतद्देशीय वाणीसमाज मुळात नव्हता व वाण्याची जातही जवळ जवळ नव्हती.[७] ते म्हणतात ते बरोबरच आहे. परंतु याकडे अशाही दृष्टीने पाहता येईल, की ऐतिहासिक व आर्थिक भौगोलिक प्रतिकूल कारणांमुळे महाराष्ट्रात मराठी वाण्यांची जात किंवा जमात मुळात नव्हती आणि मराठी व्यापारी-सावकारवर्ग भारताच्या वाणिज्य नकाशावर येण्यास बराच उशीर लागला. आणि तो जेव्हा आला, तेव्हा आर्थिक-सामाजिक कारणापेक्षा राजकीय व सामाजिक बदल हेच त्याला जास्त प्रभावी कारण ठरले. त्यामुळे इतर प्रदेशांत क्रमाक्रमाने उत्क्रांत झालेली व भिन्नपणे ओळखता येऊ शकणारी वाण्यांची प्रभावी जात महाराष्ट्रात निर्माण झाली नाही. अठराव्या शतकात महाराष्ट्रात क्रांतिकारक पद्धतीने नव्याने उदयास आलेल्या मराठी व्यापारी-सावकारवर्गात अनेक जातींचे लोक होते व त्यात ब्राह्मण जातीचे लोक प्रामुख्याने होते. ब्राह्मणांसह हा नवीन वर्ग स्वतः सामान्यपणे इहवादी व व्यवसायाच्या दृष्टीने जातिनियमांच्या अडथळ्यापासून बराचसा मुक्त होता. व्यापारी व औद्योगिक स्थित्यंतराच्या व नव्या आर्थिक युगाच्या जडणघडणीच्या दृष्टीने अशा तऱ्हेने नवीन उदयास आलेला जातिनिरपेक्ष व्यापारी-सावकारवर्ग कदाचित जास्त सुयोग्य ठरला असता असेही म्हणता येईल. ब्राह्मणांत किंवा इतरांतही ज्यांनी व्यापारी-सावकारीचा व्यवसाय अंगिकारिला, त्यांची पुनः वेगळी जात किंवा पोटजात निर्माण झाली नाही. एकाच कुटुंबात वेगवेगळे उद्योग-व्यवसाय करणारी माणसे असल्याने असे घडणे कठीण किंबहुना जवळजवळ अशक्यच होते.

प्रशासकीय व युद्धविषयक विशिष्ट तऱ्हेच्या आर्थिक कारभारपद्धतीमुळे मुख्यत्वे महाराष्ट्रातील या वर्गाचा उदय झाला होता. त्यातील बऱ्याच जणांचा राज्यकर्त्यांशी व युद्धकर्त्यांशी नात्यागोत्याचा संबंध होता. एखादी लष्करी मोहीम अयशस्वी झाली तर तिच्यासाठी दिलेल्या कर्जाच्या व उधारीच्या वसुलीसाठी मराठी व्यापारी-सावकार पुढील एखादी होण्याची, व्यवसायातील अनिश्चिततेचा एक भाग म्हणून वाट पाहू शके. किंवा त्या कर्जाच्या वसुलीप्रीत्यर्थ एखाद्या महसूल किंवा जकातीच्या कमाविसेचा हक्क किंवा एखाद्या मालाच्या विक्रीच्या मक्त्याचा हक्क मिळवी, किंवा कर्ज वेळेवर फेडण्याविषयीच्या शर्तीत आधीच अशा हक्कांसंबंधी उल्लेख कटाक्षाने करवून घेई. परकीय व्यापारी सावकारांना तत्कालीन परिस्थितीत आपल्या आर्थिक व्यवसाया-



अनुक्रमणिका

साठी मराठी व्यावसायिकांइतका राजकीय धोका पत्करणे सहसा शक्य नसे. मराठी राज्यकर्ते, युद्धकर्ते व व्यावसायिक यांच्या परस्परसंबंधाच्या बाबतीत 'ज्या गावच्या बोरी त्या गावच्याच बाभळी' असा काहीसा प्रकार होता. तशी परिस्थिती परकीय व्यापाऱ्यांच्या बाबतीत घडून येणे अशक्य नव्हे, पण कठीण होते.

## व्यापारी–सावकारवर्गाचा अस्त

सतराव्या-अठराव्या शतकात प्रथमच मराठी समाजाचे स्वतःचे असे पृथक प्रादेशिक राष्ट्र नव्याने उदयास आले. त्यात स्वतःच्या आर्थिक, सांस्कृतिक दीर्घ परंपरा नव्हत्या. त्या नसल्याने नव्या परिस्थितीला उपयुक्त ठरतील अशा नव्या संस्था निर्माण करण्याची सामाजिक सृजनशक्तीही म्हणावी तशी व तेवढी मराठी समाजात स्वराज्यकालात निर्माण झाली नव्हती. त्यामुळे शेजारील कर्नाटकातील जैन किंवा लिंगायत कन्नड व्यावसायिक श्रेणीसारख्या किंवा गुजराती महाजनांसारख्या आर्थिक संस्था मराठी समाजात अठराव्या शतकात निर्माण झाल्या नाहीत; आणि अशा दीर्घायुषी संस्थांमुळे लाभणारे व्यावसायिक स्थैर्य व त्यांच्या योगे आर्थिक सुविधा-समुच्चयात पडणारी महत्त्वाची भर यांचा फायदा तत्कालीन मराठी समाजाला मिळाला नाही. भक्कम आर्थिक पायावर उभे राहू शकणारे व बाह्य बिगर-आर्थिक प्रकारच्या, म्हणजे राजकीय वगैरे, आधाराशिवाय चालू शकणारे उद्योगधंदे मराठी प्रदेशात सामान्यपणे निघालेच नाहीत. त्यामुळे अठराव्या शतकात मोठ्या संख्येत जो मराठी व्यापारी-सावकारवर्ग पुढे आला तो प्रकार जवळजवळ आळवावरच्या पाण्यासारखाच ठरला. नवीन उदयास आलेला व्यापारी–सावकारवर्ग अधिक काळ टिकून राहता तर कदाचित इष्ट ते अनुकूल आर्थिक बदल व नवीन आर्थिक संस्थांची जडणघडण महाराष्ट्रात होऊ शकली असती. पण हा 'जर तर' चा विचार आहे. एकोणिसाव्या शतकाच्या सुरवातीस महाराष्ट्र ब्रिटिश सत्तेच्या आधिपत्याखाली येऊन जेव्हा मराठी व्यावसायिकांना मिळणारा स्वकीयांचा राजाश्रय व युद्धाश्रय संपला, तेव्हा इथला व्यापारी-सावकारवर्गही पालापाचोळ्याप्रमाणे कुठल्या कुठे पार उडून गेला. महाराष्ट्रात ब्रिटिश राज्य आल्यावर अनेक मराठी सावकारांची व्यावसायिक पत पार खलास झाली. कारण, त्यांतील अनेकांनी लष्करी मोहिमांसाठी किंवा इतर लष्करी कारणांसाठी स्वकीय युद्धकर्त्यांना जी कर्जे दिली होती त्यांची वसुली करणे ब्रिटिश सरकारच्या धोरणामुळे मराठी सावकारांना अशक्यप्राय होऊन गेले.[२८] पुढे प्रत्यक्षात ब्रिटिश सरकारने मराठ्यांच्या सैन्यउभारणीसाठी सावकारांनी दिलेली कर्जे रद्दबातलच ठरविली. या बाबतीत २ जून १८३२ रोजी डेक्कनचे ब्रिटिश डेप्युटी एजंट जॉन वॉर्डन यांनी दिलेला निर्णय पाहण्यासारखा आहे.[२९]

अठराव्या शतकात उदयाला आलेल्या मराठी व्यापारी-सावकारवर्गाचे क्षेत्र मुख्यत्वे कर्जाच्या देण्यातून होणारा नफा व कमी अंतराची अंतर्गत वाहतूक व व्यापार एवढ्यापुरतेच मर्यादित राहिले. त्या मर्यादित क्षेत्रातून तो वर्ग बाहेर पडण्याआधीच शिवपूर्वकालाप्रमाणे पुनः परकीयांचे आधिपत्य आले. स्वराज्याच्या काळात मराठी व्यापारी-सावकारांत फारशी कुणी व्यापारी उद्योजकता किंवा कल्पकता दाखविली नाही, किंवा कुठे खऱ्या अर्थाने भांडवलगुंतवणूकही केली नाही. केली ती मुख्यत्वे पैशाची उलाढाल व त्या अनुषंगाने केलेले व्यवहार. एकोणिसाव्या शतकात ज्या वेळी नजीकच्या मुंबई शहराची व्यापारी व औद्योगिक प्रगती झपाट्याने होऊ लागली होती, त्या वेळी पुण्यातील जुनी श्रीमंत व सावकारी घराणी या दृष्टीने पूर्णपणे निष्क्रिय राहिली. ब्रिटिशांच्या आगमनानंतर काही मराठी धनिक कुटुंबांनी पुण्यातील आपले वास्तव्य हलविले होते हे खरे.[३०] तथापि, सर्वच धनिकांनी काही पुणे सोडले नव्हते. परंतु त्यांच्यांतील कुणी आधुनिक व्यवसायांत किंवा कारखान्यांत भांडवलगुंतवणूक करण्यास पुढे सरसावल्याचे दिसत नाही. पुण्यातूनच निघणाऱ्या **ज्ञानप्रकाशात** ३१ जानेवारी १८५९ च्या एका संपादकीय टिपणात या विषयावर चर्चा आली आहे. त्यात संपादकांनी नाव घेऊन सुचविले आहे, की सरदार नातूंसारख्या पुण्यातील मराठी धनिकांनी मुंबईतील उद्योजकांचे उदाहरण डोळ्यांपुढे ठेवून या शहरातही भांडवली उद्योग सुरू करावेत. तथापि हे संपादकीय विचार केवळ वर्त-

मानपत्राच्या रकान्यातच राहिले आणि प्रत्यक्षात मात्र तसे काही घडले नाही.

पेशवेकाळाच्या अखेरीपासून गुजराती, मारवाडींसारखे बाहेरील व्यापारी महाराष्ट्रात सर्वदूर पसरू लागले. एकोणिसाव्या शतकात ते सर्व लहानमोठ्या मराठी गावांत जाऊन वसले. शिवाय येथल्या शहरा-खेड्यांतील सावकारी व व्यापारी व्यवसायांवरही त्यांनी आपली पकड पक्की केली.

## तात्पर्य

अठराव्या शतकापूर्वीचा महाराष्ट्र, शेजारील माळवा, गुजरात, तेलंगण, कर्नाटक इत्यादी प्रदेशांशी तुलना करता आर्थिक व सांस्कृतिक दृष्टीने मागासलेला होता. सतराव्या शतकातील मराठी राजकीय सत्तेच्या स्थापनेमुळे व नंतरच्या शतकातील राज्यविस्तारामुळे मराठी समाजाला अनेक क्षेत्रांत प्रगती करण्याची संधी मिळाली. त्या एकंदर प्रक्रियेचाच एक भाग म्हणून महाराष्ट्रात एक नवा अस्सल मराठी असा व्यापारी–सावकारवर्ग उदयास आला. जो स्थानिक व्यापारी–सावकारवर्ग महाराष्ट्रात अठराव्या शतकात उदयास आला, त्यात अनेक जातीचे लोक होते. तथापि त्यात ब्राह्मणांचे स्थान प्रमुख होते. ह्या वर्गाचा उदय व त्याची प्रगती ही बव्हंशी तत्कालीन राज्य-अर्थव्यवहार व युद्ध-अर्थव्यवहार यांवर आधारित व अवलंबून होती. ब्रिटिश राजवटीमुळे हा बाहेरील आधार जेव्हा नाहीसा झाला, तेव्हा ब्रिटिशपूर्व कालात नव्याने उदयास आलेला मराठी व्यापारी–सावकारीवर्गही पार कोलमडून नाहीसा झाला.

अठराव्या शतकात भारतातील काही प्रदेशात कापसासारख्या व्यापारी पिकामुळे अनेक ग्रामीण व नागरी भागांत महत्त्वाचा आर्थिक बदल घडून आला. यात स्थानिक शेतकरी, व्यापारी, सावकार इत्यादी सर्वांचे हितसंबंध गुंतलेले होते. गुजरातेत अधिकाधिक जमीन कापसाच्या लागवडीखाली येऊ लागली तर बंगालमध्ये व आंध्रात तेथल्या कापडव्यवसायासाठी बाहेरून कापसाची अधिकाधिक आयात होऊ लागली. असा उद्योगाधिष्ठित मूलगामी स्वरूपाचा आर्थिक बदल महाराष्ट्राच्या बाबतीत अठराव्या शतकात घडून आला असे म्हणता येत नाही.

भांडवलपूर्व उत्पादनपद्धतीच्या अर्थव्यवहारात सावकारी व्यवसायाचा महत्त्वाचा वाटा असतो. पण केवळ सावकारी व्यवहाराचे प्रमाण किंवा व्याप्ती वाढत गेल्याने उत्पादनप्रकारात आमूलाग्र बदल किंवा स्थित्यंतर होत नसते. त्यास इतर अनेक आवश्यक सामाजिक–आर्थिक बदलांची जोड असावी लागते. या दृष्टीने विचार करता, अठराव्या शतकात उदयास आलेला मराठी व्यापारी–सावकारवर्ग नवीन भांडवली उत्पादनप्रकार घडवून आणण्याच्या दृष्टीने खूपच अपुरा होता असे म्हटले पाहिजे. त्या वर्गाने भारतात इतरत्र प्रचलित असलेल्या उपलब्ध उत्पादनपद्धतीतही आपले पैसे गुंतवले नव्हते. मग नव्या भांडवली उत्पादनप्रकाराचे नावच नको.

भारतात सतराव्या-अठराव्या शतकात राजकीय घडामोडींवर अवलंबून जे आर्थिक बदल घडून आले त्यांचे स्वरूप बरेचसे वरवरचे होते. अठराव्या शतकात महाराष्ट्रात जो आर्थिक बदल घडून आला व नव्या व्यापारी–सावकारवर्गाचा उदय झाला, तोही अशा वरवरच्या आर्थिक बदलाचाच एक प्रकार होता, असे म्हणावे लागेल.

## संदर्भ व टीपा


१. ध. रा. गाडगीळ, **पुणे शहरातील महाजन व नगरशेठ** (पुणे, १९६२), पृ. १५.
२. **कित्ता,** पृ. २७.
३. Ramendra Nath Nandi, *Religious institutions and cults in the Deccan C. A. D. 600 A. D. 1000* (Delhi, 1973), p. 51.
४. शं. गो. तुळपुळे, प्राचीन मराठी कोरीव लेख (पुणे १९६३), संबंधित लेख; A. Appadorai, Economic Conditions in Southern India 2 Vols. (Madras, 1936) p. 391; मु. ग. पानसे, **यादवकालीन महाराष्ट्र १००० ते १३५० ( इ. स.)**, (मुंबई १९६३), पृ. ६५, २१५–७.









५. V. D. Divekar, 'Maritime trading settlements in the Arabian sea region upto 1500 A. D., *Artha Vijnana* Vol. 22 No. 3, Sept. 1980.

६. वि. का. राजवाडे लेखसंग्रह ३ खंड (१९२८–३५), खंड १, 'ऐतिहासिक प्रस्तावना' पृ. ३५२.

७. तुळपुळे, प्राचीन मराठी कोरीव लेख पृ. ९२–३,२७५, लेखांक १२, १७, ३४, ५३–५.

८. A. S. Altekar, *Rashtrakutas and their times* ( Pune 1934 ) pp. 201–4.

९. स्मृतिचंद्रिका आचारकांड; कूर्मपुराण; आपस्तंभ स्मृति, इत्यादी.

१०. *Selections from the Satara Raja's and the Peshwa's Diaries* ( Henceforth referred to as SSRPD ) ed. by G. C. Vad. 9 Vols. ( Pune, 1906–1911 ) Vol. 1 Document no. 364.

११. गाडगीळ, पुणे शहरातील महाजन व नगरशेठ, पृ. २०.

१२. भारत इतिहास संशोधक मंडळ, त्रैमासिक खंड २२, अंक ३–४, जानेवारी–एप्रिल १९४२, पृ. ८९–९३.

१३. SSRPD Vol. 7, p. 309–11.

१४. SSRPD Vol. 3, p. 145.

१५. रा. वि. ओतुरकर, संपा. पेशवेकालीन सामाजिक व आर्थिक पत्रव्यवहार १७२२–१८५४ ( पुणे, १९५० ) पृ. ८३–४; अर्जाची तारीख २२ ऑगस्ट १७९५.

१६. H. Green, *The Deccan ryots and their lend tenure* (Bombay 1852 ), Appendix II : Commodity prices at Pune market in the 18th century.

१७. या संदर्भात पहा : नाना फडणीस यांचे नारो शिवदेव यांस होळकरसरकारकडून यावयाच्या थकबाकीसंबंधीचे पत्र ( इ. स. १७८३ ), वा. सि. बेंद्रे, संपा. जुन्या मासिक त्रैमासिकात प्रसिद्ध झालेली महाराष्ट्रेतिहासाची साधने ३ खंड ( मुंबई, १९६६ ), खंड ३ रा, पृ. २४७.

१८. ना. गो. चापेकर, पेशवाईच्या सावलीत ( पुणे, १९३७ ), पृ. १२१.

१९. 'बखर प्रयाग अनंत फणसे ह्याच्या वंशाची', 'चांद्रसेनीय कायस्थ प्रभूंच्या इतिहासाची साधने' खंड १, अंक ६, जानेवारी १८८२, पृ. १–११.

२०. पुणे दप्तर – घडणी दप्तर रुमाल क्र. ७४८.

२१. SSRPD Vol. 7, p. 309–11.

२२. *Selections from the Peshwa Dafter* 46 Vols. ed. by G. S. Sardesai ( Bombay 1934 ), Vol. 22, pp. 131–3.

२३. SSRPD Vol. 7, p. 69.

२४. *Ibid*. p. 68.

२५. *Ibid* pp. 288–9.

२६. उदाहरणार्थ पहा : वसई येथे दिलेल्या सवलती. SSRPD Vol. 2, p. 139, 140.

२७. गाडगीळ, पुणे शहरातील महाजन व नगरशेठ, पृ. १५.

२८. चापेकर, पेशवाईच्या सावलीत, पृ. १२४–५, २५६.

२९. किता. पृ. २६८.

३०. K. A. Ballhatchet, *Social policy and social change in western India* 1817–1830 ( London, 1957 ).


○ ○ ○









# धर्मकोशाची ५१ वर्षे

ना. बा. मराठे

व्यक्तीला पन्नास वर्षे उलटली की आपल्या जीवनातील वजाबाकी किती हे नजरेखाली घालून त्याचे विहंगमावलोकन करणे हे त्यानंतरच्या जीवनातील योजना आखण्याच्या दृष्टीने महत्त्वाचे असते. व्यक्तीच्या पन्नास वर्षांच्या जीवनात पहिली पंचवीस वर्षे बालपणात शिक्षणात जातात. पुढील पंचवीस वर्षे लग्न, मुले, संसार, अर्थार्जन यांत कशी जातात कळत नाही. वयाची पन्नाशी उलटली की, माणूस आपल्या बऱ्या-वाईट अनुभवांच्या आवर्तातून बाहेर पडण्याचा प्रयत्न करू लागतो. या प्रयत्नात काही माणसे हताश होऊन दैववादी बनतात, तर तुलनात्मकदृष्टया काही तुरळक माणसे आपल्या अनुभवाच्या बळावर काही नव्या योजना आखून हाती घेतात अन् त्या पुऱ्या करण्यासाठी तनमनधनाने प्रयत्न करतात. ती त्या कार्यात व्यक्तिशः पूर्ण एकरूप होऊन गेलेली दिसतात. ही कामे पैशाच्या लोभातून न केली जाता पूर्णतः विद्यापीठस्तरावर प्रबोधनात्मक स्वरूपाच्या स्वारस्याने केली जात असल्याने ती पुरी होतात, सफल होतात, निर्दोष होतात. म. म. पां. वा. काणे यांनी एका हाती हातावेगळा केलेला ' हिस्टरी ऑफ धर्मशास्त्र ' हा प्रकल्प याचीच साक्ष देतो. आणि धर्मकोश व मीमांसाकोश ही अशीच अनन्यसाधारण उदाहरणे !

## धर्मकोशकार्याची मुहूर्तमेढ

स्वामी केवलानंदसरस्वती (पूर्वाश्रमींचे पं. नारायणशास्त्री मराठे) हे असेच एक ध्येयवादी तत्त्वनिष्ठ, आजन्म ब्रह्मचारी राहून मधुकरी वृत्तीने राहणारे, तत्कालीन पुरोगामी-परिवर्तनवादी विचारवंत पंडित ! हिंदुधर्म हा परिवर्तनशील आहे हे सिद्ध करावयाचे तर प्राचीन कालापासून चालत आलेल्या धर्मशास्त्राचे मूलभूत समजले जाणारे स्मृतिग्रंथ तपासले पाहिजेत आणि त्यांत कालपरत्वे कसकसे बदल होत गेले आहेत, हे त्या त्या ग्रंथांच्या (मूल ग्रंथांच्या) वचनाधारेच लोकांना दाखवून द्यावयाचे असा मनात घाट घालून त्यांनी इ. स. १९९५ सालापासून प्रत्यक्ष कामाला सुरुवात केली.

परिवर्तनवादी पंडितांची भूमिका काहीशी अशी होती :

१. देशकालपरिस्थितीप्रमाणे निरनिराळ्या युगांत धर्माचे स्वरूप बदलत आले आहे. मूलभूत तत्त्वे बदलत नाहीत, त्यांचे नवे संशोधन होते, नवा प्रकाश पाडला जातो. त्या मूलभूत नैतिक तत्त्वांच्या अनुसाराने वेळोवेळी परिस्थितिसापेक्ष आचारांचे नियमन आणि संस्कारांचे विधि-निषेध ठरविले जातात.

२. ऐतिहासिक दृष्टिकोण ठेवून धर्मग्रंथांचा वा धर्मशास्त्रग्रंथांचा अर्थ लावल्याने ऐतिहासिक कालात वेळोवेळी परिवर्तने घडत आली आहेत याचा स्पष्ट मागोवा धर्मग्रंथांच्या तुलनात्मक अभ्यासाने घेता येतो. श्रुति-स्मृति-पुराणोक्त धर्महो असाच परिवर्तित होत आला आहे.

३. आचारभ्रष्टांचे शुद्धीकरण ऐतिहासिक कालात होत आले असून नव्या नव्या निर्माण झालेल्या जातींचा समावेश या श्रुति–स्मृति–पुराणोक्त धर्मात होत आलेला आहे आणि या कामी धर्मग्रंथांमध्ये आधार मिळतो.

४. ब्राह्मण व शूद्र हे दोनच वर्ण सध्याच्या प्रचलित काळात अस्तित्वात आहेत असे म्हणणे बरोबर नसून ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे चारही वर्ण गुणकर्मविभागाने अस्तित्वात आहेत. वर्णविचार हा जाति–विचाराशी संबद्ध नसून तो त्याचे कामाशी निगडीत आहे. वर्ण हे माणसाच्या पिढीजात स्वीकारलेल्या व्यवसायामुळे ठरतात व ते परिवर्तनशील असतात. कोणत्या जातीत जन्माला आला यावरून त्याचा वर्ण न ठरविता तो कोणत्या दर्जाचे काम करतो यावर त्याचा वर्ण ठरविला जातो

अनुक्रमणिका








याची नोंद धर्मग्रंथांच्या आधारे समाजाला दाखवून द्यावयाची गरज आहे.

कालपरत्वे व भौगोलिक देशपरत्वे माणसाच्या आचारात बदल घडतो. आचारात बदल घडतो म्हणून तो पतित ठरत नाही. मूलभूत नैतिक आचरणातून तो घसरला तर तो भ्रष्ट झाला असे मानले जावे ही बाब धर्मग्रंथांतून दाखवून द्यावयाची आवश्यकता आहे.

## धर्मकोशाचा प्रारंभकाळ

वरील तत्त्वनिष्ठ विचार लक्षात घेऊन स्वामीजींनी धर्मकोशाच्या प्रारंभीच कार्याला सुरुवात केली. प्रारंभीच्या काळी त्यांच्या बरोबर धर्मशास्त्राचे ग्रंथ चाळून त्यांतून योग्य ती वचने संगृहीत करण्याचे कामी श्रौताचार्य धुंडिराजशास्त्री बापट, नरहरशास्त्री तळेकर व व्यंकटेशशास्त्री वळे यांनी हातभार लावला. मुळात 'संस्कार'कांड व व्यवहारकांड अशी दोन कांडेच हातात घेण्यात आली होती. व्यक्तिजीवनात केले जाणारे षोडश संस्कार वेळोवेळी कसे केले जात त्याचा स्मृतिग्रंथांची मूळ वचने उद्धृत करून कालपटानुरूप त्याचा समावेश करावयाचा व व्यवहार—म्हणजे हिंदुधर्मात चालू असलेला कायदा—त्याचे स्वरूप कसे होते याचा मागोवा घ्यावयाचा. तो मूळ धर्मशास्त्रीय ग्रंथांतील वचनांची त्या त्या विषयानुरोधे रचना करून! अशी कार्यपद्धती स्वीकारली गेली. या कामी हैदराबाद येथील दानशूर श्री. वामनराव नाईक यांनी एकरकमी २ हजार रुपये स्वामीजींना साहाय्य दिले ... त्यामुळे मूळ स्मृतिग्रंथांची जमवाजमव करण्यापासून शास्त्रीवर्गाला थोडे फार आर्थिक साहाय्य देण्याइतपत स्वास्थ्य आले व धर्मकोशकार्याचा श्रीगणेशा घातला गेला. हे काम इ. स. १९२५ मध्ये सुरू झाले. त्यामुळे येत्या इ.स. १९८५ मध्ये या कामाला ६० वर्षे पुरी होतील. हीरक महोत्सव करायचा तर त्या कामाच्या सर्वांगीण आढाव्याचे स्वरूप असे :

## तत्काली झालेला सामाजिक परिणाम

स्वामींच्या या प्रगतिशील पुरोगामी विचारपद्धतीने वाटचाल सुरू झाल्याने काही उघड उघड परिणाम दृश्य स्वरूपात दिसू लागले. राष्ट्रीय प्रगतीस अडथळा आणणारे सामाजिक व धार्मिक परंपरेतील दोष नष्ट करून सुधारणा घडवून आणण्याच्या विचारांना चालना मिळाली. धर्मग्रंथांचे व सामाजिक रूढींचे गुणावगुण शोधून त्यांची सभांतून चर्चा होऊ लागली. धर्मनिर्णयमंडळासारखी संस्था अस्तित्वात आली. धर्मग्रंथांचे आलोडन व परिशीलन करून बदलत्या काळाला अनुरूप अशी सुधारणेची तत्त्वे व कार्यक्रम समाजात दृढ होऊ लागले. परंपरेचा समूळ विच्छेद न करता तिला कालानुरूप नवीन रूपे देण्याचा परिपाठ सुरू झाला. धार्मिक व सामाजिक सुधारणांचा विचार धर्मग्रंथांच्याच आधारे दृढमूल करता येईल या विचारांना अधिक पाठिंबा मिळू लागला. महात्मा गांधींनी अस्पृश्यतानिवारणेला शास्त्राधार सापडतो का हे अजमावून पाहण्यासाठी स्वामीजींची पुण्याला खास पाचारण करून मुलाखत घेतली. ब्राह्मण-वैश्य विवाहाला धर्मग्रंथांची मंजुरी आहे व तसा विवाह लावण्यास स्वामीजींचे शिष्य पुढे आले. प्राचीन भारताच्या इतिहासात समाजधारणा व प्रगती होण्यासाठी अनेक वेळा आचारविचारांत परिवर्तने घडून आली आहेत याचे सरसहा दाखले धर्मकोशाच्या प्रारंभिक अवस्थेतच लोकांना दाखवून देता येऊ लागले. स्त्री—पुरुषांच्या विवाहाची वयोमर्यादा वाढविण्यास, प्रौढ विवाहास, स्त्रियांच्या पुनर्विवाहास धर्मशास्त्रांत आधार मिळतात एवढेच नव्हे तर कालमानाप्रमाणे रूढ पद्धतीत बदल घडवून आणणे हे सामाजिक दृष्ट्या न्याय्य आहे याचा पाठपुरावा समाजात चालू झाला. वर्णव्यवस्था ही जन्मसिद्ध जातिभेदांवर विसंबून न ठेवता ती गुणकर्मांवर आधारलेली असावी या विचारांचा पुरस्कार समाजात होऊ लागला.

## धर्मकोशकार्यात खंड पडला

धर्मकोशाचे हे ऐतिहासिक कार्य हिरीरीने चालू असता देशातील राजकीय आंदोलनामुळे स्वामीजींनी चालवलेली माध्यमिक पाठशाळा बंद ठेवावी लागली. कारण पाठशाळेचे अध्यापक तुरुंगात रवाना झाले. शास्त्रीमंडळीही भिन्न भिन्न कारणांस्तव काम सोडून गेली. स्वतः पं. नारायणशास्त्री मराठे यांनी २२ ऑक्टोबर १९३१ रोजी संन्यास घेतला व ते केवलानंद सरस्वती झाले. स्वामीजींचे पट्टशिष्य तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी हे इ. स. १९३२

अनुक्रमणिका






साली तुरुंगातून सुटून आल्यावर त्यांना साऱ्या कोशकार्याची पुन: जमवाजमव करावी लागली.

## कार्यपद्धतीत बदल

संपूर्ण ग्रंथांतील वचने एका कपटयावर एक वचन अशा पद्धतीने लिहून काढावयाची व नंतर ती वचने ऋषिनिहाय व विषयवार लावायची असा परिपाठ होता. परंतु प्रथमकाण्डाचा पहिला भाग प्रकाशित करायचे ठरविल्यावर त्या परिपाठात भर घालावी लागली. मूळग्रंथांची म. म. काणे यांनी ठरविलेल्या कालक्रमानुरूप क्रमवारी ठरविली गेली. मूळ वचनावर निबंध-टीका ग्रंथांमधून आलेल्या टीका-टिप्पणींचीही भर घालण्यात आली, ती कालक्रम लक्षात घेऊनच. तसेच मूळ वचनांचे पाठभेद सापडले तर त्यांचेही टिप्पणीतून स्थलादि-निर्देशांसह उल्लेख देण्यात येऊ लागले.

वेगवेगळ्या ग्रंथांतून आलेली मतमतांतरे पुनरुक्ती टाळून नमूद करण्याची शिस्त या कामात लावण्यात आली.

१) वचन संग्रह, २) ऋषिवार विभाग, ३) ऋषिनिश्चिती, ४) प्रकरणश: विभाग, ५) पाठ-निर्णय, ६) शास्त्रार्थ-टीका-टिप्पणी देणे, ७) संपादकीय तपासणी, ८) मुद्रणप्रत- अशा क्रमाने या कोशकार्याची जमवाजमव करण्याची पद्धत स्वीकारण्यात आली.

या धर्मकोशाचे एकूण ११ खंड किंवा काण्डे होतील असा अंदाज त्या वेळी केला गेला होता. ती अशी :

१) व्यवहार किंवा प्राचीन कायदा, २) वैदिक अध्यात्मविद्या, ३) विवाहादी संस्कार, ४) राजनीती, ५) वर्णाश्रमधर्म, ६) शुद्धी व श्राद्ध, ७) प्रायश्चित्त, ८) शांतिकर्म, ९) पुराणागमधर्म, १०) कालतत्त्व, ११) मोक्ष.

## धर्मकोशमंडळाची स्थापना

या कामाची जबाबदारी एका व्यक्तीवर न ठेवता त्या कामाला संस्थेचे व्यापक स्वरूप देण्याच्या दृष्टीने तर्कतीर्थांनी 'धर्मकोशमंडळ' नावाची संस्था इ.स. १९३४ साली स्थापन केली. या संस्थेचे न्यायमूर्ती सर सिताराम एस्. पाटकर अध्यक्ष म्हणून निवडले गेले होते, श्री. भवानीशंकर नियोगी व सर प्रभाशंकर पट्टनी हे दोघे उपाध्यक्ष, स्वत: तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी व श्री. वासुदेवशास्त्री कोनकर चिटणीस. सदस्य म्हणून खालील ख्यातनाम मंडळी होती :

१) श्री. न. चिं केळकर, २) श्री. के. एम. मुनशी, ३) श्री. प्र. बा. गजेन्द्रगडकर, ४) श्री. शंकरराव संभाजी गांगला, ५) श्री. रा. ग. सोमण.

याशिवाय सल्लागार मंडळही होते. त्यात-

१) श्रीमंत बाबासाहेब पंतप्रतिनिधी, २) सरदार माधवराव किबे, ३) श्री. पां. वा. काणे, ४) पं. के. ल. दप्तरी, ५) श्री. रामनारायण पाठक, अहमदाबाद, ६) श्री. चैतन्यप्रसाद जोशी, दिवाण, अहमदाबाद व ७) श्री. भास्करराव दामले, ठाणे या महनीय व्यक्तींचा समावेश होता. इ. स. १९३७ साली व्यवहारकाण्डाचा पहिला भाग प्रसिद्ध झाला. त्याच्या संपादकवर्गात खालील नावे दिली आहेत.

१) श्री. तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी-मुख्यसंपादक
२) श्री. रंगनाथशास्त्री जोशी- उपसंपादक, साहित्यशास्त्री.
३) श्री. के. ल. दप्तरी- उपसंपादक.
४) प्रा. वासुदेव गोपाळ परांजपे, एम्. ए. एल्एल्. बी., डी. लिट्, फर्ग्युसन कॉलेज, पुणे, उपसंपादक
५) प्रा. नरहर रघुनाथ फाटक, मुंबई, उपसंपादक.
६) प्रा. पी. आर. दामले, एम्. ए. एल्एल्. बी. वाडिया कॉलेज, पुणे, उपसंपादक.
७) श्री. प्र. बा. गजेन्द्रगडकर, एम्. ए. एल्एल्. बी., वाडिया कॉलेज, पुणे, उपसंपादक.
८) पं. वासुदेवशास्त्री कोनकर, चिटणीस, वाई.

तर्कतीर्थांनी ज्यांच्या मदतीचा गौरवपूर्ण उल्लेख केला आहे त्यात खालील व्यक्तींची नावे महत्त्वाची आहेत. कै. सखारामशास्त्री भागवत, तळेकरशास्त्री, व्यंकटाजार्य वळे, व्ही. ए. रामचंद्रशास्त्री वेदान्तशिरोमणी, पी. एन्. पट्टाभिरामशास्त्री मीमांसाचार्य, एम्. व्ही. गोखले वेदान्तशास्त्री, न्यायाचार्य पांडुरंगशास्त्री गोस्वामी आणि इतर...

तसेच वेगवेगळ्या कार्यक्षेत्रांत महशूर असणाऱ्या अनेक व्यक्तींनी या कामी हस्ते परहस्ते मदत केली, त्यांचाही नामोल्लेख प्रस्तावनेत झालेला आहे. गुरुवर्यांचा आदरपूर्वक उल्लेख केलेली मूळ संस्कृत प्रस्तावना खालीलप्रमाणे-

" इदं च कार्यमस्मद्‌गुरुचरणैः श्रीमन्नारायणशास्त्रिभिः मराठे इत्युपाव्हैरधुना केवलानन्देति परिव्राजकदीक्षोचितपदारूढैः समारब्धमीशवीय शताब्द्याः १९२५ तमे वत्सरे । १९३१ संवत्सरे परिव्रज्यायां पदं निधायैतत्कार्यं समापितम् । तावति काले तैः सर्वं श्रुतिराशिमालोच्य तद्वचनसंदोहस्तत्तद्विषयविभागेन विरचितः द्वादशमहानिबन्धांश्च सम्यगभ्यस्य तदीयस्मृतिवचनानां समुद्धारः अर्धश्लोकानुक्रमणिका च व्यरचि । १९३३ संवत्सरेऽस्माभिरेतत्कार्यं स्वीकृत्य यथामति प्रवर्तितम्..." वगैरे. ३–११–१९३७.

धर्मकोशाच्या पहिल्या काण्डाचे संपादन तर्कतीर्थांनी आपल्या हाती घेतले या घटनेला इ. स. १९८३ साली पन्नास वर्षे होत आहेत. या अर्धशतकातील धर्मकोशाच्या कार्याचा आढावा या निमित्ताने घेतला गेला तर औचित्यपूर्णच ठरेल असे वाटते.

## इ. स. १९३३–१९८३

देशाच्या इतिहासात अर्धशतकाची वाटचाल सामाजिक– राजकीय स्थित्यंतरांनी व आर्थिक उलथापालथींनी मोजायची तर तो एक इतिहासच होईल. पण एका संशोधनसंस्थेच्या जीवनातील ५० वर्षांची वाटचाल ही त्या संस्थेने प्रकाशित केलेल्या अमोलिक ग्रंथसंपत्तीवरूनच तपासावी लागेल. धर्मकोश हा हिंदुधर्म या नावाने रूढ असलेल्या धर्मान्तर्गत सर्व धार्मिक मूळ ग्रंथांचा एकमेव ज्ञानकोश आहे. यावरून त्या ग्रंथाच्या उपयुक्ततेचा अंदाज घ्यावा लागेल. वेदग्रंथांपासून १९ व्या शतकापर्यंत तयार झालेल्या संस्कृत धर्मग्रंथांचा ऐतिहासिक दृष्टचा सर्वमान्य कालपट ठरवून तदनुरोधे विषयवार वचने संगृहीत करण्याचा तो एक अवाढव्य कारखाना आहे, असे म्हणणे अतिशयोक्तीचे होऊ नये. पन्नास वर्षे खपूनही मूळ योजनेत समाविष्ट असलेल्या ११ काण्डांपैकी फक्त चारच कांडांचे काम १७ भागांत प्रकाशित झाले आहे आणि दोन भागांचे काम मुद्रणाधीन आहे. चतुष्पत्री आकाराची सुमारे १२ हजार पृष्ठांची सामग्री प्रकाशित झाली आहे तर राहिलेल्या सात कांडांचीही तेवढीच पृष्ठसंख्या भरेल एवढी सामग्री होऊ शकेल असा योजनासंकल्प आहे. चार काण्डांच्या प्रत्येक कांडाचे प्रकाशन श्रीमंत सयाजीराव गायकवाड बडोदा, श्रीमती सुंदराबाई ठाकरसी, श्री. रामेश्वरदास बिडला व श्री. अरविंद मफतलाल यांनी दिलेल्या प्रत्येकी १० हजार रु. च्या उदार देणग्यांमुळे शक्य झाले. दे. भ. बाळासाहेब खेर मुख्यमंत्री असता त्यांनीही मुंबई सरकारमार्फत १० हजार रुपयांचे अनुदान दिले होते. याची कृतज्ञतापूर्वक नोंद मुख्य संपादकांनी त्या त्या काण्डाच्या प्रास्ताविक भूमिकेत केलेली आहे.

धर्मकोशाच्या या सतरा भागांचा प्रकाशनकालाचा आलेख मनोरंजक ठरावा.

| | | |
|---|---|---|
| १. व्यवहारकाण्ड | भाग १ ला | इ. स. १९३७ |
| ,, | ,, २ रा | ,, १९३८ |
| ,, | ,, ३ रा | ,, १९४१ |
| २. उपनिषत्काण्ड | ,, १ ला | ,, १९५० |
| ,, | ,, २ रा | ,, १९४९ |
| ,, | ,, ३ रा | ,, १९४९ |
| ,, | ,, ४ था | ,, १९५३ |
| ३. संस्कारकाण्ड | ,, १ ला | ,, १९५९ |
| ,, | ,, २ रा | ,, १९८० |
| ,, | ,, ३ रा | ,, १९८१ |
| ,, | ,, ४ था | ,, १९८३ |
| ४. राजनीतिकाण्ड | ,, १ ला | ,, १९७३ |
| ,, | ,, २ रा | ,, १९७३ |
| ,, | ,, ३ रा | ,, १९७४ |
| ,, | ,, ४ था | ,, १९७४ |
| ,, | ,, ५ वा | ,, १९७९ |
| ,, | ,, ६ वा | ,, १९७९ |

या प्रकाशनकालावरून असे लक्षात येते, की वैदिक अध्यात्मविद्या असे मूळ नामाभिधान असणारे दुसरे काण्ड प्रकाशित झाले त्यावेळी त्याचे उपनिषत्काण्ड असे नामान्तर झाले. दुसरा-तिसरा भाग अगोदर छापून झाला आणि मग पहिला भाग प्रकाशित झाला. याचे एक कारण असे असू शकेल, की पहिल्या भागाला तर्कतीर्थांनी जोडलेली प्रदीर्घ प्रस्तावना ! ही मूळ मराठीत लिहिली गेली आणि तिचा इंग्रजीत अनुवाद प्रा. वा. गो. परांजपे यांनी केला. अर्थातच मराठीची वाक्प्रचारशैली बदलून तिला इंग्रजी भाषेचा साज चढवायचा याला कालावधी हा लोटणारच. मात्र या ९५ पृष्ठांच्या प्रदीर्घ

प्रस्तावनेत तर्कतीर्थांनी केलेले उपनिषदांतील तत्त्वज्ञानाचे मार्मिक विश्लेषण त्यांच्या गाढ विद्वत्तेचे द्योतक समजले गेले आहे. " An exhaustive review of the origin and development of the central conceptions in the Upanisadic philosophy." असे त्या प्रस्तावनेचे शीर्षक म्हणून त्यांना अभिप्रेत होते. उपनिषदात आलेल्या स्व, आत्मन्, पुरुष व ब्रह्मन् या औपनिषदिक तत्त्वज्ञानात येणाऱ्या पारिभाषिक संज्ञांची शब्दार्थपरिणती ( semantic development ) कसकशी होत गेली याची मीमांसा भारतीय तत्त्वज्ञानाच्या इतिहासात प्रथमतःच तर्कतीर्थांनी केली हे त्यांचे या भागापुरते विशेष अवदानच मानावे लागते. उपनिषत्काण्डानंतर संस्कारकाण्डाचा पहिला भाग सिद्ध व्हायला ६ वर्षे लागली व त्याचा पहिला भाग इ. स. १९५९ साली प्रकाशित झाला. आणि त्या काण्डाचे उर्वरित २,३, ४ भाग मुद्रित होऊन प्रकाशित व्हायला सुमारे २२ वर्षांचा कालावधी खर्ची पडला असे वरील कालपट पाहता दिसत असले, तरी मध्यंतरीचा पहिला १४ वर्षांचा कालखंड स्वामी केवलानंदसरस्वतींनी एकाहाती संकलित व संपादित केलेला मीमांसाकोष हा ५ हजार चतुष्पत्री पृष्ठांचा ७ खंडात्मक कोष छापून हातावेगळा करण्यात खर्ची पडला आणि राहिलेल्या कालखंडात राजनीतिकाण्ड या चौथ्या कांडाच्या ६ भागांत प्रसिद्ध झालेल्या ग्रंथांच्या प्रकाशनाचे कार्य संपन्न झाले हे लक्षात घेतल्यास त्याची यथारीती संगती लागेल.

### प्रेसची कामगिरी

व्यवहारकाण्डाचा पहिला भाग इ. स. १९३७ साली प्रकाशित झाला. या भागाचे व दुसऱ्या भागाचे मुद्रण पुण्याच्या आर्यसंस्कृति प्रेसने केले होते. मूळ संस्कृत बिनचूक मुद्रित व्हावे यासाठी धर्मकोशाचे काम पाहण्यासाठी कार्यालय पुण्यालाच हालविण्यात आले होते. परंतु आपले काम आपल्या स्वतःच्या मुद्रणालयात झाल्यास ते अधिक व्यवस्थित होईल, मुद्रिते तपासून देण्यात वेळेचा अपव्यय होणार नाही, संस्कृतची जुळणी करणारा तज्ञ कामगारही तेच काम करणारा असल्याने अधिक तरबेज राहील व वाईसारख्या ठिकाणीच या कामाला गती मिळू



शकेल या सर्वांचा सांगोपांग विचार करून संस्थेने स्वतःचा प्रेस काढण्याचा निर्णय घेऊन त्याप्रमाणे इ. स. १९४० साली प्रेसची सामग्री येऊन रुजू झाली. या कामी लागणारी जागाही संस्थेजवळ होतीच. प्राज्ञपाठशाळेचे चिटणीस श्री. शं. वि. लेले यांनी प्रेसच्या प्राथमिक ५ वर्षांत प्रेसचे मॅनेजर म्हणून महनीय कामगिरी बजावली. व्यवहारकाण्डाचा तिसरा भाग या 'प्राज्ञ प्रेस'नेच मुद्रित केला आणि या नंतरच्या गेल्या चाळीस वर्षांत धर्मकोशाच्या १७ भागांची १२ हजार पृष्ठांची व मीमांसाकोशाच्या ७ भागांच्या ५ हजार पृष्ठांची जुळणी, छपाई व बांधणी करण्याचे सारे श्रेय या प्रेसलाच दिले पाहिजे.

धर्मकोशाच्या प्रकाशनकालाचा आलेख वर दिला आहे. त्याच्या जोडीला मीमांसाकोशाच्या प्रकाशनकालाचा आलेख जोडल्यास तो अनाठायी होऊ नये—

| | | |
|---|---|---|
| मीमांसाकोश | भाग १ ला | इ. स. १९५२ |
| ,, | ,, २ रा | ,, १९५३ |
| ,, | ,, ३ रा | ,, १९५४ |
| ,, | ,, ४ था | ,, १९५६ |
| ,, | ,, ५ वा | ,, १९६० |
| ,, | , ६ वा | ,, १९६२ |
| ,, | ,, ७ वा | ,, १९६६ |

मीमांसाकोशाचे पहिले चार भाग दुर्मिळ झाले आहेत आणि ५–७ या भागांच्या थोड्याच प्रती शिल्लक आहेत असे चौकशीअंती दिसून आले आहे. संपूर्ण मीमांसाकोश फोटो ऑफसेट पद्धतीने छापून घेतला तर त्याचा पुरा सेट उपलब्ध होऊ शकेल. आधुनिक भाषाशास्त्राच्या विचारात प्राचीन धर्मग्रंथांचा मौलिक अर्थपरिणतीचा, वाक्यसमन्वयाचा व वाक्यमीमांसेचा विचार करण्यास आपल्या पूर्वमीमांसेचे फार महत्त्वाचे अवदान आहे याचा पडताळा आता पाश्चात्त्य प्राच्यविद्यापंडितांना येऊ लागला आहे आणि त्याच्या सखोल विचाराला सुरुवात झाली आहे. या दृष्टीने भारतीय पूर्वमीमांसेच्या या ज्ञानकोशाचे महत्त्व अनन्यसाधारण आहे.

प्रेसच्या मॅनेजरचे काम इ. स. १९४५ ते १९७५ पर्यंत संस्थेचे एक घटक कै. मधुकर शंकर साठे यांनी

अनुक्रमणिका

निष्ठेने केले. धर्मकोश व मीमांसाकोश या संस्कृत ज्ञानकोशाचे जुळणी-छपाई-बांधणीचे जोखमीचे व बिकट काम त्यामुळेच आकाराला आले. तेथील कामगारांना शिस्त व बिनचूक काम करण्याची सवय लागली. संस्कृतचे काम हाती घेऊ शकणारे महाराष्ट्रात फारच थोडे छापखाने आज उपलब्ध आहेत.

## केवलानंद सरस्वती मंदिर

केवलानंद सरस्वती इ. स. १९५५ साली ब्रह्मीभूत झाल्यावर त्यांची एक उत्कृष्ट समाधी व्हावी अशी अपेक्षा बहुतेक लोकांनी व्यक्त केल्यावरून प्राज्ञपाठशाळा मंडळाने केवलानंद सरस्वती मंदिर उभारावे या कल्पनेला प्रतिसाद दिला. प्राज्ञपाठशाळेच्या समोरील पटांगणातच स्वामींचा देह ठेवण्यात आला होता, त्याच जागी मंदिर बांधण्याची कल्पना स्थिर झाली. माननीय श्री. यशवंतराव चव्हाण हे मुख्यमंत्री असता त्यांच्या पुढाकाराने महाराष्ट्र सरकारने योग्य तो प्रतिसाद देऊन इमारत-प्रकल्पाला तीन लाख २९ हजार रुपयांचे अनुदान दिले. धर्मकोशाचे ग्रंथालय व संशोधनकार्यालय तिथे व्यवस्थित चालेल अशीच योजना होती. दि. ११।१०।१९५९ रोजी त्यावेळच्या अ. भा. काँ. च्या अध्यक्षा श्रीमती इंदिरा गांधी यांच्या हस्ते इमारतीची कोनशिला बसविण्यात आली. आणि दि. १३ डिसेंबर १९६० रोजी भारताचे राष्ट्रपती श्री. राजेन्द्रप्रसाद यांच्या हस्ते मंदिराचे उद्‌घाटनही करण्यात आले. धर्मकोशाच्या मागील कालाकडे विहंगमावलोकन करून पाहायचे झाल्यास या मंदिराचा टप्पा हाही एक महनीय म्हणूनच नोंदवला पाहिजे. मंदिराच्या दर्शनीय मध्यवर्ती जागी स्वामीजींची चिंतनशील ब्राँझची प्रतिमा बसविली असून मुख्यहॉलमध्येच दरवर्षीची सरस्वतीपूजा व तन्निमित्त भरविली जाणारी शारदीय व्याख्यानमालेची पुष्पे विद्वानव्याख्यात्यांमार्फत गुंफली जातात.

मंदिराच्या प्रवेशद्वाराशी संस्कृतमध्ये रेखीव नागरी लिपीमध्ये कोरलेली माहिती अशी–

। श्रीकेवलानन्दसरस्वतीमन्दिरम् ।

' महाराष्ट्रराज्यशासनानुदानेन निर्मितं ब्रह्मीभूत-केवलानन्दस्वामिनां स्मारकमिदं भारतराष्ट्रपतिना श्री. राजेन्द्रप्रसादेन स्वकरकमलेन समुद्घाटितं महाराष्ट्रराज्यमन्त्रिमुख्ये यशवंतराव चव्हाण महोदये अध्यक्षे अद्य शुभे भारतीयसमये शके १८८२ मार्गशीर्ष २२ तिथौ ख्रिस्तसंवत्सरे १९६० डिसेंबरमासे १३ दिनाङ्के । स्थापत्यकल्पकौ–विष्णुर्महादेवपुत्रः सुवर्णपाटकी, सदाशिवो नारायणपुत्रः टिळकश्च । संविदा रचयिता– न्यूट्रिओ बिल्डर्स, पुणे.

लक्ष्मणशास्त्री जोशी
अध्यक्षः प्राज्ञपाठशाळामण्डलस्य
वाईनगरी

मंदिराची इमारत सिद्ध झाल्यावर आणखी एक घटना घडून आली. महाराष्ट्रसरकारने महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृती मंडळाची स्थापना करून तर्कतीर्थांना या संस्थेचे अध्यक्षपद बहाल केले. त्या मार्फत मराठी विश्वकोशरचना करण्याची कल्पना निघाली आणि ओघानेच मराठी विश्वकोशकार्याचे दालनही याच मंदिरात सुरू झाले. डॉ. केतकरांच्या ज्ञानकोशानंतर महाराष्ट्रात येणारा नवा प्रकल्प तर्कतीर्थांनी मार्गी लावला. महाराष्ट्रात जे अनेक कोशांचे जाळे पसरले, त्यात ' ज्ञानकोश ' अग्रगण्य होता. गेल्या पन्नास वर्षांत त्यामुळे दाते-कर्वे यांचा शब्दकोश, परिभाषाकोश, प्रा. वाडेकरांचा तत्त्वज्ञानकोश, पं. महादेवशास्त्री जोशी यांचा भारतीय संस्कृतिकोश, चित्रावशास्त्रींचा चरित्रकोश, झळकीकरांचा न्यायकोश, पदनामकोश असे कित्येक संदर्भग्रंथ तयार झाले. धर्मकोशाचे कार्य संस्कृतमध्ये असल्याने तो सामान्य लोकांच्या समोर ज्या प्रमाणात यावयास हवा होता तितका आला नसला, तरी जगातील मूर्धन्य संस्कृतज्ञांनी धर्मकोशाची एकमुखाने प्रशंसा केली आहे. महाभारताच्या संशोधित आवृत्तीचे विद्वान संपादक व्ही. एस्. सुखटणकर यांनी काढलेले गौरवोद्‌गार तर लक्षात ठेवण्यासारखे आहेत. ते म्हणतात– ' This most valuable encyclopaedia of Indian antiquities promises to become an indispensable work of reference to the future histo-rion culture. '

फ्रान्समधील प्रसिद्ध संस्कृत पंडित डॉ. लुइ रेनॉं यांनी तर ' विद्यापीठस्तरीय कार्य ' एका वाई









सारख्या खेडेगावात होत आहे हे पाहून आश्चर्य व्यक्त केले होते. प्रसिद्ध प्राच्यविद्याविशारद लुड्विग् स्टर्नबाख यांनीही धर्मकोशाच्या कार्याचे केलेले मूल्यमापन व प्रशंसोद्गार या आन्तरराष्ट्रीय कार्याची पावतीच देऊन जातात. ते म्हणतात–

'The Dharmakosha presents, as the authors collators it wished, a clear picture of the transition of ideas on each topic from the very ancient to comparatively recent times and is of an inestimable value to students interested in the study of the history of Hindu sociology, jurisprudence, ethics and the Indian state, for the complete material on the respective subjects is presented to the reader' a complete survey of the tenets and maxims of Hindu sources...'

### ग्रंथसंग्रह

'धर्म' – हिंदुधर्माचा साद्यंत ज्ञानकोश तयार करावयाचा तर त्याचा आधार म्हणजे सारे संस्कृत-मध्ये असणारे मूलग्रंथ. वेद, ब्राह्मणग्रंथ, आरण्यके, उपनिषदे, पुराणे, स्मृति, महाभारत-रामायण– आणि सारे टीकाग्रंथ यांचा संग्रह करण्याचे काम स्वामी केवलानंद सरस्वतींनी इ. स. १९१६ मध्ये प्राज्ञपाठशाळा स्थापन केल्यापासूनच सुरू केले होते. त्याचबरोबर हस्तलिखित पोथ्यांचा संग्रहही केला जात होता. आज अशा ११ हजारांवर पोथ्या या ग्रंथालयात जमा झाल्या असून केंद्रसरकारच्या अनुदानाने त्या पोथ्यांचे दोन भागात कॅटलॉग्जही प्रसिद्ध झाले आहेत. शिवाय ६ हजार संस्कृत मुद्रित ग्रंथ, ६ हजार मराठी व ६ हजारांवर हिंदी-इंग्रजी पुस्तके या ग्रंथालयात उपलब्ध आहेत. ही पुस्तके लाकडी कपाटांत व्यवस्थित ठेवली गेली असून त्यांचा धर्मकोशाच्या संशोधन कार्याबरोबरच मराठी विश्वकोशाच्या संदर्भासाठीही वापर होतो.

### हीरकमहोत्सव

धर्मकोशाचे कार्य तर्कतीर्थांनी हाती घेतल्याला पन्नास वर्षे लोटली तर प्रत्यक्ष कार्याचा श्रीगणेशा स्वामी केवलानंद सरस्वती ( पूर्वाश्रमीचे पं. नारायणशास्त्री मराठे ) यांनी घातला त्याला एक-दोन वर्षातच साठ वर्षे होत आहेत. तो मोठ्या प्रमाणात साजरा करावयाचा आहे. म्हणून धर्मकोशाचे कार्य समाजासमोर येणे अगत्याचे आहे. महाराष्ट्रातील तपस्वी लोक आपले कार्य भले की आपण भले अशा गोड समजुतीत प्रसिद्धिपराङ्मुख राहून आपापल्या स्वीकृत कार्यांत मग्न असतात. त्याचे सुंदर उदाहरण म्हणून या धर्मकोशाच्या संशोधनास वाहून घेतलेल्या पंडितांचे देता येईल. तर्कतीर्थांच्या बरोबरीने संकलन–संपादन कार्याला गेली ५० वर्षे वाहून घेतलेले श्री. रंगनाथशास्त्री जोशी हे एक त्यांतील ज्वलन्त उदाहरण. तसेच पं. गोविंदशास्त्री केळकर हे या संशोधनकार्यात इ. स. १९४५ पासून अविरत कार्य करीत आहेत. पं. नारायणशास्त्री सहकारी हेही इ. स. १९६० सालापासून या कामात व्यग्र आहेत. त्यांच्या बरोबरीने आलेले पं. अनंतरामशास्त्री उपाध्ये हे राजनीतिकांडाच्या संकलनकार्यात भागीदार होते. धर्मकोशाच्या कामी तनमनधनाने काम करणारी ही शास्त्रीमंडळी एवढ्या कमी वेतनावर काम करतात की त्याची वाच्यता करणेही जिवावर येते. या पुढील दोन वर्षांत हा हीरकमहोत्सव साजरा करायचा तर धनिकांनी या भारताच्या अत्यंत महत्त्वाच्या संशोधनकार्याला सढळ हाताने देणग्या द्यायला हव्यात.

### संस्थेपुढील योजना

धर्मकोशाच्या संकल्पित ११ काण्डांपैकी फक्त चार कांडांचे १७ भाग प्रसिद्ध झाले आहेत. तर पुढील ५) वर्णाश्रमधर्मकाण्ड, ६) शुद्धिश्राद्धकाण्ड, ७) प्रायश्चित्तकाण्ड, ८) शान्तिकाण्ड, ९) पुराणागमकाण्ड, १०) समयकाण्ड व ११) मोक्षकाण्ड अशी सात कांडे तयार करवून ती मुद्रित करावयाचे प्रचंड मेहनतीचे काम अजून शिल्लक आहे. स्वामी केवलानंदांनी सुरू करून हातावेगळा केलेला दुसरा प्रकल्प म्हणजे मीमांसाकोश. याच धर्तीवर इतर दर्शनकोश तयार करण्याचा संकल्प हाती आहे– उदा. १) साहित्यशास्त्रकोश, २) आयुर्वेदकोश, ३) न्यायवैशेषिककोश, ४) बौद्धधर्मकोश, ५) जैनधर्म-








कोश, ६) अद्वैतवेदान्तकोश, ७) द्वैताद्वैतवेदान्तकोश, ८) विशिष्टाद्वैतवेदान्तकोश, ९) द्वैतवेदान्तकोश, १०) शुद्धाद्वैतवेदान्तकोश व ११) सांख्ययोगकोश.

या पुढील पन्नास वर्षांत जर हे काम तडीस गेले नाही तर ते त्यापुढील कालात होणे कठीण ! कारण हळूहळू सरकारच्या संस्कृतशिक्षणाच्या धोरणामुळे संस्कृत विषय घेऊन तयार होणारी तरुण मंडळी अभावानेच तळपतात. जुने शिकलेले तज्ज्ञ संस्कृतज्ञ आताच मिळेनासे झाले आहेत. जे आहेत त्यांना पुरसे वेतन मिळत नाही, अशी गंभीर समस्या संस्थेपुढे आहे. या कोशमंडळाच्या योजनांमध्ये अभ्यागत सम्पादकवर्गाला राहण्यासाठी आधुनिक पद्धतीचा प्रशस्त आवास–निवास बांधण्याची योजनाही मार्गस्थ होत आहे. त्यासाठी संस्थेने जागाही खरेदी केली आहे.

या सर्व संकल्पित योजना पार पाडायच्या तर इमारतीसाठी कमीत कमी ३० लाख रुपये, कोशकार्याला वीस लाख रुपये व प्रकाशनकार्याला ५० लाख रुपये लागतील. एवढा हा भव्य प्रकल्प आहे. एकूण हिन्दुधर्म आणि संस्कृती यांच्या संदर्भात संस्कृत मूलस्रोतग्रंथांच्या जतनाच्या दृष्टीने हे कार्य अत्यंत महत्त्वाचे आणि संस्कृतिजतनाच्या दृष्टीने महत्त्वपूर्ण आहे याची जाणीव समाजातल्या दानशूर धनिकांना व्हावी एवढाच उद्देश या आढाव्यामागे आहे.











अनुक्रमणिका

# दस्तएवस्कीय कादंबरी

अनिरुद्ध कुलकर्णी

आधुनिक कादंबरीचा पाया फ्लोबेरने घातला. तो आणि दस्तएवस्की हे खरे समकालीन. दोघांचाही जन्म १८२१ चा. फ्लोबेर १८८० साली गेला तर दस्तएवस्की ८१ च्या जानेवारीत. दोघेही फार मोठे कादंबरीकार. फ्लोबेरचे लिखाण मोजके होते पण त्याने फार खोलवर विचार केला आणि कादंबरीच्या स्वरूपात आमूलाग्र क्रांती केली. त्याच्या 'मादाम बोवारी' आणि 'लेद्युकांसिओ सॉन्तिमेन्ताल' या दोन युगप्रवर्तक कादंबऱ्यांसमोर तोपर्यंत लिहिल्या गेलेल्या पूर्वीच्या कादंबऱ्या अस्ताव्यस्त आणि पडक्या वाडयांसारख्या वाटू लागल्या. फ्लोबेरनंतर येणारा कोणताही चांगला युरोपियन कादंबरीकार बाल्झाक, डिकिन्झ, किंवा ह्यूगो यांच्या कादंबऱ्यांकडे खऱ्या कौतुकाने पाहू शकला नाही. त्यांची निर्भेळ प्रशंसा करू शकला नाही.

दस्तएवस्कीवर फ्लोबेरचा प्रभाव नव्हता. त्याच्या कादंबऱ्यांची रचना आणि बांधणी पाहताच ते कळून येते. तरी त्यांच्या दोघांच्या कादंबऱ्यांची तुलना फलप्रद ठरते. टॉल्सटॉय आणि दस्तएवस्की यांच्या तुलनेपेक्षा ही निश्चितच जास्त प्रकाश टाकणारी ठरते. कारण तिच्यामुळे 'आधुनिक कादंबरी' आणि दस्तएवस्कीय कादंबरी यांच्यांतील तफावत सुस्पष्ट होते. दोघांच्या वास्तववादातील फरक समजतो.

फ्लोबेरची कादंबरी आखीवरेखीव आणि अगदी नीटस आहे, बांधेसूद आहे, तर दस्तएवस्कीची कादंबरी काहीशी विस्कळीत वाटते. तिच्या रचनेतील शैथिल्य लपत नाही. फ्लोबेर पानापानाचाच काय पण वाक्यावाक्याचा आणि स्वल्पविराम, उद्गार चिन्हांचाही विचार करताना दिसतो. फाफटपसाराच काय पण त्याचे एखादे वाक्यही 'अनावश्यक' वाटत नाही. दस्तएवस्कीय कादंबरी काही ठिकाणी पाल्हाळिक आणि बऱ्याच वेळा जाडजूड होते. फ्लोबेरमध्ये उपकथानक नाहीच. तर दस्तएवस्कीत मोठ्या कादंबऱ्यांत 'उपकथानक' किंवा तत्सम भाग येतात. छोटेखानी 'विलेज ऑफ स्तेपानचिकोव्हो' मध्येही उपकथानक येऊ शकते. फ्लोबेरमध्ये वातावरणनिर्मितीसाठी सुरेख वर्णने, निसर्गवर्णने सहजगत्या पण थोडक्यात येतात. दस्तएवस्कीत अशी वर्णने क्वचित येतात. फ्लोबेर व्यक्तिरेखांची संख्या मोजकी ठेवतो आणि एकच पात्र केंद्रस्थानी राखतो. दस्तएवस्की खूप व्यक्तिरेखा आणतो आणि त्या तपशीलाने उभ्या करतो. फ्लोबेर पात्रांच्या तोंडून स्पष्ट असे तत्त्वज्ञान मांडण्याचा मोह टाळतो. सूचक वाक्ये फक्त येतात. दस्तएवस्कीची पात्रे तत्त्वचिंतन करतात आणि त्यानुसार वागतातही. एवढेच काय पण त्याच्या कादंबऱ्यांची जडण-घडणच तत्त्वज्ञानाच्या प्रभावाखाली होते. फ्लोबेरमध्ये संवादांचा उपयोग अतिशय काटेकोरपणे होतो. दस्तएवस्कीत संवाद, वादविवाद, चर्चा, खडाजंगी यांचा भरपूर उपयोग होतो. पत्रेही मोठी लिहिलेली असतात. फ्लोबेरमध्ये भडक, असंभाव्य, नाटकी प्रसंग कटाक्षाने टाळलेले असतात. दस्तएवस्कीत ते येऊ शकतात. एवढेच काय प्रसंगी रहस्यकथांतील क्लृप्त्यांचाही वापर होऊ शकतो.

आणि तरीही आधुनिक कादंबरीवर दस्तएवस्कीचा फ्लोबेरएवढाच मोठा प्रभाव आहे. जीद, काफ्का, मान, जॉईस, काम्यू, सार्त्र, ब्योल, सोल्झेनित्सिन यांसारखे अनेक मोठे कादंबरीकार दस्तएवस्कीच्या प्रभावाखाली आलेले आहेत. फ्लोबेर आधुनिक कादंबरीचा रासीन असेल तर दस्तएवस्की शेक्सपीयर आहे, किंवा फ्लोबेर कालिदासासारखा वाटला तर दस्तएवस्की आधुनिक साहित्याचा व्यास आहे.

अनुक्रमणिका

दस्तएवस्कीच्या प्रत्येक कादंबरीमागे संकल्पना Idea असते. मग ती कादंबरी सुरुवातीची ' दि डबल ' असो की, अखेरची ' ब्रदर्स कारामाझोफ ' असो. कलाकृतीतून देखील एखादी मूलभूत संकल्पना व्यक्त व्हावयास हवी हा आग्रह युरोपातील अभिजात परंपरेतील आग्रह होय. दस्तएवस्की या आग्रहाला सुरुवातीपासून शेवटपर्यंत चिकटून होता यात आश्चर्य नाही. कारण त्याला नेहमीच काही सांगायचे असे आणि हे सांगणे अगदी व्यवस्थितपणे झाले पाहिजे असेही त्याला वाटत असे. स्त्राखोव या त्याच्या मित्राला लिहिलेल्या पत्रात[१] दस्तएवस्की एके ठिकाणी त्याच्या ' इडियट ' या कादंबरीविषयी म्हणतो, " या माझ्या कादंबरीत घाईघाईने लिहिलेला आणि पसरट असा भाग बराच आहे. मला नीट मांडता आलेला नाही असाही काही आहे. माझ्या कादंबरीच्या नव्हे तर माझ्या ' कल्पने 'च्या बाजूने मी उभा आहे." आणि ही मूलभूत 'कल्पना' ही की, इडियटचा अभिमान इतका विकृत आहे की, स्वतःला देव समजावे असेच त्याला वाटते आणि दुसरीकडे त्याला स्वतःविषयी इतका अनादर आहे की, स्वतःविषयीच्या अनावर द्वेषातच त्याची परिणती व्हावी. ' क्राईम अॅण्ड पनिशमेंट ' आणि ' ब्रदर्स कारामाझोफ ' या कादंबऱ्यांतील मूलभूत कल्पना इतक्या ठळक आहेत की, त्या कादंबऱ्यांच्या नावांतूनच व्यक्त झाल्या आहेत. एकाच माणसात दोन व्यक्तिमत्त्वे– किंवा व्यक्तिमत्त्वांचे दोन स्तर असतात, एक तार्किक (रॅशनल) तर दुसरे अतार्किक (इररॅशनल) ही त्याची फार फार लाडकी ' कल्पना ' ' दि डबल ' या नावातूनच त्याने व्यक्त केली आहे.

टॉलस्टॉयने ' कला म्हणजे काय ?' या त्याच्या प्रबंधातून दस्तएवस्कीच्या या भूमिकेवर टीका केली आहे. Idea आणि feeling या दोहोत द्वैत कल्पून कलेचे आणि साहित्याचे कार्य कलावंताने स्वतःच्या मनातील feeling रसिकांपर्यंत नेऊन पोहोचविण्याचे आहे असे त्याने मांडले आहे. चांगली कला आस्वादकाला भावनेचा ' संसर्ग ' करते आणि सर्वांत चांगली कला धार्मिक भावनेचा ' संसर्ग ' करते हे टॉलसटॉयचे मत सुप्रसिद्ध आहे.

पण मौज म्हणजे कादंबरीतून ' कल्पना ' मांडण्याच्या, पोहोचविण्याच्या दस्तएवस्कीय भूमिकेवर जरी टॉल्सटॉयने प्रतिकूल टीका केली असली तरी दस्तएवस्कीच्या कादंबऱ्यांना तो उत्कृष्ट कलाकृती मानतो. कारण त्या ख्रिश्चन धर्मातील माणसामाणसातील ऐक्याची व विश्वबंधुत्वाची भावना यशस्वी तऱ्हेने वाचकाप्रत नेऊन पोहोचवितात असे तो सांगतो.

प्रत्येक कादंबरीमागे जशी कल्पना संकल्पना हवी तशीच प्रत्येक व्यक्तिरेखेमागे देखील हवी असे दस्तएवस्की मानतो. ' इडियट ' च्या नोट्स्मध्ये रोगोजिन– वासनेवर आधारलेले प्रेम, गान्या– गर्वातून उत्पन्न होणारे प्रेम तर प्रिन्स मिश्किन –ख्रिश्चन प्रेम व्यक्त करणारे आहेत असे नोंदलेले आहे.

' कल्पना ' व्यक्त करण्याची किंवा मांडण्याची ही वैचारिक भूमिका दस्तएवस्कीने कधीही सोडली नाही. परंतु त्याच्या कादंबऱ्या म्हणजे प्रबंध किंवा व्यक्तिरेखा म्हणजे विचारांच्या मूर्ती झालेल्या दिसून येत नाहीत. याचे कारण जिवंत धगधगीत अनुभव आणि जबरदस्त प्रतिभा यांची कमतरता त्याला कधीच पडली नाही. किंवा दस्तएवस्कीतील कलावंत त्याच्यातील विचारवंताने खाऊन टाकला असेही कोठे घडले नाही. आपल्याला जे काही सांगायचे आहे त्यामुळे पुरोगामी मंडळी आपल्याला प्रतिगामी ठरवतील किंवा ज्या पद्धतीने आपण सांगतो आहोत त्यामुळे कलावादी आपल्यावर रुष्ट होतील ही भीती ' दि डेव्हिल्स ' प्रकाशित करताना दस्तएवस्कीच्या मनात जरूर होती, परंतु तो बिचकला नाही किंवा मागे सरलेला नाही. याचे कारण स्वतःच्या साहित्यिक गुणांविषयी त्याला असलेला पुरेसा आत्मविश्वास हे होय.

ज्याप्रमाणे ' वैचारिकता ' हे दस्तएवस्कीय कादंबरीचे ठळक वैशिष्टय आहे, त्याचप्रमाणे ' नाट्यमयता ' हे तिचे दुसरे ठळक वैशिष्टय आहे. नाटकात किंवा सिनेमात शोभतील असेही अनेक प्रसंग दस्तएवस्कीच्या कादंबऱ्यांत घडतात. मृत्यू, खून, आत्महत्या यांची वाण तर कधीच पडत नाही. असे का घडते, हा प्रश्न विचारणे उचित आहे. कारण दस्तएवस्की ज्या काळात लिहित होता तेव्हा

कादंबरीच्या क्षेत्रात तरी वास्तववाद प्रभावी ठरू लागलेला होता. युरोपात फ्लोबेर तर रशियात गोगोल हे त्याचे प्रमुख प्रवर्तक होते. भडक, अतिरंजित, काल्पनिक एवढेच नव्हे तर तथाकथित 'नाट्यमय' प्रसंग टाळून सामान्य माणसांचे दैनंदिन चित्रण जिवंतपणे व कलात्मकतेने करणे हे वास्तववादाचे प्रमुख उद्दिष्ट होते. गोंचारोव या रशियन कादंबरीकाराची 'ओब्लोमोफ' ही कादंबरी युरोपभर गाजली ती तिच्यातील वास्तववादामुळे. नायकाच्या निष्क्रिय आणि रटाळ जीवनात एकमेव प्रेमप्रकरण येते आणि तेही बेरंगी ठरते हे सूक्ष्म तपशिलाने दाखविणारी आणि जिवंतपणे चित्रित करणारी ही कादंबरी आजही वाचनीय वाटते ती तिच्यातील वास्तववादामुळे.

अशा वास्तववादापुढे देखील दस्तएव्स्कीने त्याच्या नाट्यमय आणि अनपेक्षित प्रसंगांचा आग्रह कधी सोडला नाही. तो स्वतः गाजला ते देखील त्याच्या 'मानसशास्त्रीय' वास्तववादामुळेच. म्हणून या आग्रहालासुद्धा महत्त्व आहे, त्यामुळे तो समजावून घेतला पाहिजे. त्यासाठी त्याने स्त्राखोवला लिहिलेल्या एका पत्रातील भाग[२] उद्बोधक ठरतो. दस्तएव्स्की म्हणतो, "कलेमधील वास्तवासंबंधी माझी स्वतःची अशी काही धारणा आहे; बहुतेक लोक ज्याला जवळजवळ चमत्कृतिपूर्ण आणि अपवादात्मक म्हणून म्हणतील ते तर मला वास्तवाचे सारच वाटते. घटनांचा सुमारपणा आणि त्यांच्याविषयीची प्रचलित भूमिका हा माझ्या मते वास्तववाद नव्हे. खरे म्हणजे वास्तववाद नेमका याच्याविरुद्ध आहे. कुठल्याही वर्तमानपत्रात तुम्हाला अगदी वास्तव घटनांचा वृतान्त आढळतो आणि या (घटना) अगदी विचित्र आणि गुंतागुंतीच्या देखील असतात. आपल्या लेखकांना त्या चमत्कृतिपूर्ण वाटतात, आणि ते त्यांची फिकीर देखील करीत नाहीत. तरी देखील त्या घटना वास्तवच होत, कारण त्या घडलेल्या घटना आहेत. त्यांची दखल घेणे, त्यांचे स्पष्टीकरण देणे, वर्णन करणे हे कोण करणार? त्या क्षणोक्षणी घडतात, प्रत्येक दिवशी घडतात आणि त्या अपवाद तर नव्हेत... माझी चमत्कृतिपूर्ण 'इडियट' वास्तव नाही काय, आणि तसे पाहिले तर अगदी सामान्य वास्तव! का बरे, अगदी सामान्य, उखडून निघालेल्या आपल्या काही सामाजिक स्तरात अशा व्यक्ती असायला हव्यात ना? प्रत्यक्ष जीवनातच चमत्कारिक ठरले आहेत असे वर्ग!"

म्हटले तर हे स्पष्टीकरण आहे म्हटले तर समर्थनही आहे. कारण खरे म्हणजे वास्तववादाची भूमिका समतोलपणे मांडली तर विस्मयजनक नाट्यमय प्रसंगांची संपूर्ण वगळ करायची असा तिचा निष्कर्ष निघत नाही. इब्सेन वास्तववादी नाटककारच होता आणि त्याच्या नाटकांतही विस्मयजनक ठरावे असे बरेच काही होते. वादाचा मुद्दा हा होता की, अशा प्रसंगांवर किती भर द्यायचा आणि त्यांच्यावर भिस्त किती ठेवायची. म्हणजे मुद्दा होता तो प्रमाणाचा होता.

दस्तएव्स्कीत येणारी नाट्यमयता ही भडक कृत्यांतून येते तशीच अनपेक्षिततेतूनही येते. आणि प्रत्येक प्रकरणातून ही अनपेक्षितता असते. उदाहरण द्यायचे झाले तर आल्योनाच्या खुनाचे घेता येईल. कादंबरीच्या सुरुवातीच्या भागातच हा खून येतो. ही एक भडक घटना आहे आणि त्या अर्थाने नाट्यमयही आहे. पण हे खास दस्तएव्स्कीय नाट्य नव्हे. खून काय रहस्यकथेतही असतो. पण या प्रकरणाला खरा रंग भरतो तो आल्योनाच्या खुनामुळे नाही. तो अपेक्षित आहे. वाचकाच्या मनाची काहीशी पूर्वतयारीही त्या संदर्भात झालेलीच असते. पण याच खुनाच्या वेळी रास्कोलनिकोफला आल्योनाच्या बहिणीचा म्हणजे लिझावेताचा देखील खून करणे भाग पडते. आणि हे सर्वस्वी अनपेक्षित ठरते. रास्कोलनिकोफला देखील ही अनपेक्षितता असह्य ठरते. पुढे त्याचे मानसिक विघटन जे होते त्यात ही असह्य अनपेक्षितता महत्त्वाचा धागा ठरते. अशीच अनपेक्षितता फ्योदोर पावलोविचच्या खुनात नाट्य निर्माण करते. मित्या खून करणार हे वाचकाच्या मनात पक्के झालेले असते. पण ऐनवेळी खून स्मेर्द्याकोफ करतो. आणि यामुळे जी गुंतागुंत निर्माण होते आणि कमालीचे विलक्षण नाट्य निर्माण होते ते पुढे साऱ्या कादंबरीभर महत्त्वाचा घटक ठरते. हे खास दस्तएव्स्कीय नाट्य आहे. त्याच्या कादंबऱ्यांतून जी 'द्वंद्वे' आणि 'आत्महत्या' येतात त्यातही हे नाट्य आपल्याला भेटत

राहते. अर्थात ही अनपेक्षितता असंभाव्य नसते. जे घडते ते अशक्य कोटीतील बिलकूल नसते, पण ते पूर्णपणे मानसिक धक्का देणारे असते आणि हा धक्का इतका अस्वस्थ करणारा असतो की, वाचक त्यामुळे दस्तएवस्कीच्या प्रतिभेच्या पंजातच जणू सापडतो आणि आकाशात उचलला जातो.

दस्तएवस्कीय 'नाटयमयता' मानवी जीवनातील जीवन-मृत्यूची द्वंद्वात्मक भव्यता वाचकासमोर उभी करते. याचे सर्वोत्कृष्ट उदाहरण हे 'दि डेव्हिल्स' मधील शातोफच्या खुनाचे होय. आपला खून होऊ घातला आहे हे शातोफला माहीत नसते. वाचकाला मात्र त्याची कल्पना असते. अंधाऱ्या रात्री बाहेर पडणारा शातोफ मृत्यूकडे निघालेला असतो. तेवढ्यात त्याची बायको कित्येक वर्षांनी घरी परतते. नुसती परततच नाही तर प्रसूत होते आणि मुलाला जन्म देते. आनंदाच्या बेहोषीत शातोफ डॉक्टरांकडे जायला निघतो आणि हे डॉक्टर जोड-पेच त्याचा खून घडवून आणीत असते. शातोफ बाहेर पडतो; खून करणाऱ्यांनाच मानवी जीवनातील पुत्रजन्माचा आनंद वर्णन करून सांगतो. पुढे भीषण तऱ्हेने शातोफचा खून होतो. त्याचे प्रेत दगड बांधून तळयात टाकले जाते.

एकीकडे जवळ येत असलेला मृत्यू आणि दुसरीकडे पुत्रजन्माची घटना आणि तिने उडालेली शातोफच्या मनाची तारांबळ यांचे द्वंद्व-नाटय फक्त दस्तएवस्कीच उभे करू शकतो. या द्वंद्व-नाटयातील घटनांचा क्रम आणि त्यांचे चित्रण ही त्याच्या प्रतिभेची असामान्य थोरवी दर्शवितात. एखाद्या झंझावातासमोर गवत पार लवून जावे त्याप्रमाणे या नाटयाच्या तुफानासमोर वाचकाचे मन पार सपाट होऊन जाते. असेच नाटय आपल्याला मेरी लेब्यातकिनचे बालकासंबंधीचे दिवास्वप्न आणि प्रत्यक्षात तिची होणारी दारुण हत्या या प्रसंगी पाहावयास मिळते. स्विद्रिगायलोफची आत्महत्या आणि त्याला स्वप्नात भेटणारी 'छोटी मुलगी' यांचा तणाव देखील असेच नाटय काव्यमय स्वरूपात घडवून आणतो, आणि वाचकाला स्तिमित करतो.

दुन्याशाचे स्विद्रिगायलोफवर गोळया झाडणे, ओर्दिनोफचे मूरीन ह्या म्हाताऱ्यावर हल्ला करणे, नास्तासियाचे शेकोटीत रूबल्सच्या नोटांचे पुडके फेकणे, स्तावरोजिनचे गागानोफवर गोळया न झाडता हवेत गोळया झाडणे, असे अनेक म्हणजे अनेक प्रसंग दस्तएवस्कीच्या कादंबऱ्यांत वाचकाला भेटतात आणि भारावून टाकतात, कारण ते कोठेच ओबडधोबडपणे येत नाहीत. त्यांच्यातील नाटय दस्तएवस्की मोठ्या सामर्थ्याने रंगवितो. काही दुर्दैवी स्थळे सोडली तर त्यांचा अगदी 'हिंदी सिनेमा' कोठे होत नाही. केवळ अपघातांमुळे नाटय निर्माण होते आहे असे वाटत नाही..

अस्सल दस्तएवस्कीय नाटय नेहमी आंतरिक असते, मानसिक असते. प्रत्यक्ष खून आणि त्या खुनाची कबुली या दोन घटनांमध्ये जो नाटयमय प्रवास घडतो तो मुख्यत्वे आंतरिक आहे. त्यामुळेच 'क्राईम ॲण्ड पनिशमेंट' रंगभूमीवर आणण्याचे प्रयत्न यशस्वी होऊ शकले नाहीत. 'मादान बोवारी'-तील नाटयासारखेच हे नाटय आहे. आपल्याजवळ जे नाटय, जी नाटयात्मकता आहे तो आणि प्रत्यक्ष नाटकातील नाटय, रंगभूमीवर येणारे नाटय यांतील तफावत दस्तएवस्कीला देखील माहीत होती. त्याने आपल्या कादंबऱ्यांची कधी नाटयरूपांतरे करण्याचा यत्न केला नाही किंवा नाटके लिहिण्याचाही प्रयत्न केला नाही. रंगभूमीवरील नाटयमयता वेगळी आणि कादंबरीतील नाटयमयता वेगळी याचे किमान भान त्याला होते.

दस्तएवस्कीय विश्वात जे प्रसंग घडतात, त्यांना साजेसेच वातावरण त्यांना घेरून टाकते. विशेष म्हणजे तपशीलवार वर्णने, निसर्गवर्णने यांचा अभाव असला तरी हे वातावरण सतत भेडसावत राहते. ताणलेले, कमालीचे खिन्न आणि अस्वस्थ, गडद आणि कुंद वातावरण त्याच्या प्रत्येक कादंबरीत भेटते. 'अंकल्स ड्रीम' सारखी हलकी फुलकी कादंबरी देखील शेवटीशेवटी अशाच वातावरणात प्रवेश करते. बदल असावा म्हणून देखील या वातावरणात बदल होत नाही. वाचकाच्या मनावर सतत दडपण हे राहतेच. अंधारलेले वाडे, ढगाळलेले आकाश, क्रूर गारवा घेऊन येणारी हिमवृष्टी, झोंबरे वारे, घोडागाड्यांचा किणकिणाट, क्वचित ऐकू येणारे चर्चच्या घंटांचे नाद, गरम चहा, शेकोटीची ऊब, हे या वातावरणाचे घटक होत. सूर्यास्ताचा लालसर उदास प्रकाश

अनुक्रमणिका

या वातावरणाला उजाळतो. पण त्यातील खिन्नता हटवू शकत नाही. पण या वातावरणात झपाटण्याचे सामर्थ्य असते. एकदा का वाचक या वातावरणात गुरफटला गेला की त्यातून तो बाहेर पडू शकत नाही. मानसिक 'सस्पेन्स' अशा वातावरणात सहज निर्माण होऊ शकतो. या वातावरणात घडणारे प्रसंग वाचकाला भारून टाकतातच; पण खुद्द लेखकही स्वतः भारावून ते वाचकाला सांगतो आहे असे वाटत राहाते. दस्तएवस्कीय "वातावरण" काय चमत्कार करू शकते हे पाहायचे असेल, तर वोलोव्येव स्टेशनाशेजारील एका गावात मित्त्या प्रत्यक्ष खुनाच्या आधी जाऊन येतो ते प्रकरण पाहावे. या वातावरणाचा प्रत्येक कणन् कण कसा रोमांचित होतो आणि वाचकाला सुन्न करून सोडतो ते येथे दिसते. अशा वातावरणात शोकान्तिकेला पर्याप्रच नसतो. अत्यंत संयमित माणसाचा देखील तोल बिघडावा अशी शक्ती या वातावरणात असते तर छोट्या नेलीने किंवा इल्युशाच्या वडिलांनी पैसे पायाखाली तुडविले तर विशेष ते काय !

पण विलक्षण नाट्यमय प्रसंग आणि प्रखर वैचारिकता यांना जोडणारा घटक, खरा घटक दस्तएवस्कीय 'व्यक्ती' हीच होय. समर्थ 'व्यक्तिरेखा' हा दस्तएवस्कीय कादंबरीचा तिसरा आणि सर्वांत महत्त्वाचा घटक होय, वैशिष्टय होय. वाचल्यानंतर कालांतराने आपल्याला दस्तएवस्कीच्या कादंबऱ्यांतील प्रसंगांचे विस्मरण होऊ शकते, होतेही. पण आपण त्याची पात्रे, विशेषतः महत्त्वाची पात्रे म्हटले तरी विसरू शकत नाही. कारण दस्तएवस्कीच्याच शब्दांत ही पात्रे 'more real than the real' असतात.

प्रसंगांची मांडणी, कथानकाची जडण-घडण मोडून तोडून जणू ह्या व्यक्तिरेखा आपल्यासमोर उभ्या राहतात. दस्तएवस्कीय विश्वातच मुळी आपण प्रवेश करतो ते या व्यक्तिरेखांच्या परिचयातून. कुठल्याही पात्राची ओळख आपल्याला जिवंत तपशिलातूनच होते, नीट होते. प्रसंगांतून माणसे समजतात असे आपण नेहमी म्हणतो. पण दस्तएवस्कीत माणसे समजतात आणि प्रसंगांतून आणखी समजतात. नायक, नायिका, खलनायक असल्या पारंपरिक कल्पना मात्र ह्या व्यक्ती समजत असताना निरर्थक असल्याचे जाणवते.

व्यक्तीचे वर्णन करावे ते दस्तएवस्कीने. मग ती व्यक्ती लहान असो की मोठी, तरुण असो की वयस्क, चांगली असो की वाईट. दस्तएवस्की आपल्या डोळ्यांसमोर ती इतक्या झपाट्याने उभी करतो, की आपण खरोखरच चकित होऊन जातो. आणि ही व्यक्ती आता काय करेल, कशी वागेल, कशी बोलेल यासंबंधीची उत्सुकता, कमालीची उत्सुकता आपल्या मनात दाटून राहते. गुत्यात घेऊन जाणारी आणि आपली जीवनकथा ऐकविणारी बालकोवस्की, मार्मालादोफ किंवा वेसिलोफ सारखी पात्रे तर विलक्षण मौज आहे. अशा व्यक्ती दस्तएवस्कीतच भेटू शकतात.

कुठले पात्र मोठे होईल आणि आपल्या मनःचक्षूंसमोरच्या रंगमंचाचा ताबा घेईल याचा तर नेमच नसतो. 'क्राईम ॲण्ड पनिशमेंट' चा उत्तरभाग स्विद्रिगायलोफ तर 'इडियट'चा उत्तरार्ध इपोलित कसे हा हा म्हणता काबीज करतात हे सांगायला नको. आपल्याही जीवनात अशाच कोणी कोणी व्यक्ती घुसून आपले जीवन उजळीत नसतात काय, असे आपण मनाशी म्हणतो. रास्कोलनिकोफ आणि मिश्किन दस्तएवस्कीय विश्वातच बाजूला पडू शकतात. तुर्गेन्येफ किंवा फ्लोबेर यांच्या 'कलात्मक विश्वात' तसे कसे घडेल ?

दस्तएवस्कीच्या प्रत्येक पात्रामागे एक महत्त्वाची कल्पना असते हे खरे, परंतु पात्राचा जिवंतपणाच एवढा असतो की, ही कल्पना कोठे खुपत नाही. 'ग्रँडमा'च्या मागे स्वतःला अतार्किक तऱ्हेने उधळून देणे ही कल्पना आहे. मृत्यूच्या छायेत अनेक व्यक्ती अशा 'डेस्परेट' होतात आणि आयुष्यात कधीही वागल्या नाहीत अशा तऱ्हेने वागतात हेही आपण पाहतो. पण दस्तएवस्कीय 'ग्रँडमा' अशा जिवंतपणे कादंबरीत येते आणि जाते की, आपण गार पडतो, ग्रँडमाच्या 'मागे' तत्त्वज्ञान आहे याचेही भान आपल्याला राहत नाही. ती जणू तिचे पैसे उधळून टाकते तसे आपण आपला 'कॉमन सेन्स' वाऱ्यावर सोडून देतो, आणि तिला स्वीकारतो.

समकालीन कोणाही कादंबरीकारापेक्षा दस्तएवस्कीची 'पात्रे' उंच होतात आणि अविस्मरणीय

ठरतांत याची तीन प्रमुख कारणे दिसतात ती अशी : या व्यक्तिरेखांना प्रत्यक्ष जीवनात मूळ असते. उदा., वेरहोवेन्स्कीचे मूळ क्रांतिकारक नेचात्रेफ. या मूळ संदर्भाचा दस्तएवस्कीने फार काळजीपूर्वक 'अभ्यास' केलेला असतो. त्यामुळे दस्तएवस्कीची कुठलीही व्यक्तिरेखा थोडीशी अतिरंजित वाटली तरी खोटी किंवा काल्पनिक वाटत नाही. तिच्याबाबतचा तपशिलाचा जिवंतपणा नेहमीच खात्रीलायक वाटतो. दुसरे म्हणजे दस्तएवस्कीच्या कुठल्याही व्यक्तिरेखेची उलगड किंवा वाढ कमालीची उत्स्फूर्त वाटते, ती नियोजित वाटत नाही. ही उत्स्फूर्तता क्षणोक्षणी जाणवते आणि व्यक्तिरेखेला वेडेवाकडे आकार देत जाते. कोण केव्हा काय करेल याचा अक्षरशः भरवसा नसतो. तथाकथित दुष्ट पात्रही या विश्वात एकदम चांगले वागून जाते अन् चांगला माणूसही एकादे हलकट कृत्य करू शकतो. मादाम स्तावरोजिन मेरी लेब्यातकीनच्या अंगावर स्वतःची शाल पांघरू शकते किंवा स्तावरोजिन तीन रूबल्स मागणाऱ्या उपाशी फेदकाच्या अंगावर नोटाच नोटा भिरकावून देऊ शकतो. सहज भेटणारा मास्लोबोयेव नेलीला मदत करणाऱ्या वान्याच्या मदतीला धावून येऊ शकतो किंवा हातात आलेल्या कातेरिना हवानोवनाचा उपभोग घेण्याऐवजी मित्या तिला सरळ सोडून देऊ शकतो. याचे कारण सखोल विचार करून वागणारी दस्तएवस्कीय पात्रे देखील उत्स्फूर्तता दूर सारू शकत नाहीत. तिसरे म्हणजे प्रत्येक व्यक्तिरेखा दस्तएवस्की सारख्याच उत्कट जिव्हाळ्याने रंगवितो. म्हातारा तोत्स्की असो की रूपगर्विता पोलिना असो, मद्यपानाने खलास झालेला मार्मोलादोफ असो की बुद्धिमान आणि अभ्यासू इवान असो, दस्तएवस्कीचा जिव्हाळा सर्वत्र सारखाच पाझरत राहातो. जणू काही तो सर्व प्राणिमात्रांवर सारखेच प्रेम करणारा ईश्वर आहे असा भास व्हावा. हे नुसतेच विचित्र नाही तर केवळ अ-सामान्य आहे. कोणाही मोठ्या साहित्यिकात न आढळणारा असा हा एक विलक्षण गुण दस्तएवस्कीत आपल्याला आढळतो. दस्तएवस्कीची वैचारिक बाजू आपण सांगू शकतो; परंतु त्याला कोणत्या पात्राविषयी जास्त जिव्हाळा वाटत असावा हे आपण समजूही शकत नाही किंवा त्याच्याविषयी अंदाजही बांधू शकत नाही. दुष्ट, नालायक, मूर्ख, अपंग किंवा दुर्दैवी पात्रेदेखील तो ज्या जिव्हाळ्याने, ज्या तन्मयतेने रंगवितो त्याला खरोखरच तोड नाही.

या जिव्हाळ्याचा परिणाम म्हणून अद्‌भुत किमया दस्तएवस्की साधू शकतो. ती म्हणजे प्रत्यक्ष जीवनात घडलेल्या घडामोडींचा आधार दस्तएवस्कीने नेहमी वारंवार घेतला तरी या घडामोडी, घटना सर्वस्वी रूपांतरित होऊन दस्तएवस्कीय भावविश्वात 'नव्याने' घडतात. एका रशियन मुलाने वडिलांचा केलेला खून आणि कादंबरीत मित्याने प्रत्यक्षात (न) केलेला फ्योदोर पावलोविचचा खून यांत पार जमीनअस्मानाचा फरक पडतो. नेचायेफचा खटला आणि पीटर वेरहोवेन्स्कीने केलेला शातोफचा खून यांत गुणात्मक फरक पडतो. दस्तएवस्कीची कुठलीही कथा कधीही रहस्यकथा होत नाही. दस्तएवस्की गुन्हेगारांच्या बाजूनेही असतोच असतो.

हा जिव्हाळा म्हणजे अनुकंपा किंवा कणव नव्हे, हे स्पष्ट केले पाहिजे. दस्तएवस्कीला रास्कोलनिकोफविषयी वाटणारा जिव्हाळा आणि आणि थिओडोर ड्रायझरला क्लाईड ग्रिफिथविषयी वाटणारी अनुकंपा यांत फार फरक आहे. आणि हा फरक असल्यानेच 'क्राईम अँण्ड पनिशमेण्ट'ची उंची किंवा गहनाई 'अमेरिकन ट्रॅजिडी' ला नाही. या जिव्हाळ्याचे मूळ किंवा मुळे दस्तएवस्कीच्या आयुष्यात व व्यक्तिमत्वात दडलेली असतील; पण हा विलक्षण जिव्हाळा आहे आणि तसाच परिणाम घडवून आणणारा ठरला आहे हे मात्र खरे.

प्रत्यक्ष कथासंविधानकाची गुंफण यांत दस्तएवस्कीच्या कादंबऱ्यांची थोरवी सापडण्यासारखी नाही. तसेच पाहिले तर रचनात्मक आणि कथात्मक दृष्टया 'ए रॉ यूथ' ही खूपच व्यवस्थित कलाकृती आहे. पण ती यशस्वीही नाही आणि लोकप्रियदेखील ठरलेली नाही. उलट 'दि डेव्हिल्स' ही कथा आणि संविधानकदृष्टया खूपच विस्कळित आहे. पण ती अतिशय प्रभावी आणि लोकप्रिय ठरलेली कादंबरी आहे.

याचे कारण हेही असेल, की 'डेव्हिल्स' च्या प्रकृतीला रचनात्मक विस्कळितपणा बाध आणीत









नाही. एका शांत आणि सुखी गावात नास्तिक समाजवादाने पछाडलेली माणसे कशी येतात व त्या गावातील वातावरणाचा कसा विचका उडवितात व विध्वंस करतात ह्याचे चित्रण हे या कादंबरीचे उद्दिष्ट आहे. आणि हे चित्रण फार प्रभावी तऱ्हेने होते. मुळातच अनेक 'कथा' एकत्रित गुंफता येतील अशी ही कल्पना असल्याने एकसंध कथावस्तूची एवढी गरज येथे भासत नाही. म्हणजे दस्तएवस्कीने या कादंबरीची आणखी नीट बांधाबांध केली असती तर ही कादंबरी आणखी जास्त प्रभावी झाली असतीच याची खात्री देता येत नाही. उलट, ' ए रॉ यूथ ' रचनात्मक दृष्टचा नीटनेटकी असली, तरी तिच्यातील वैचारिकता, नाटयमयता आणि व्यक्तिचित्रण हे तर कमी पडतातच; शिवाय कथाही निष्कारण एका ' शुल्लक ' पत्राभोवती, दस्तऐवजाभोवती गिरगिरत राहते अशी भावना अखेरीस निर्माण होते. या कादंबरीला वाचवीत काय असेल तर ती वेर्सिलोफची व्यक्तिरेखा ही होय.

एकसंधतेसाठी दस्तएवस्की संविधानकाची रचना इतकी महत्त्वाची मानीत नाही हे खरे; पण तो कादंबरीत आणखी एका प्रकारे एकसंधता निर्माण करतो आणि हे तंत्र खास दस्तएवस्कीय आहे. तो नेहमी अनेक कुटुंबांमधील संबंधांची गुंतागुंत दाखवितो. वैचारिक सूत्राची–कल्पनेची एकता एकीकडे आणि ही संबंधांच्या जाळयातून येणारी एकसंधता दुसरीकडे. कुटुंबे ही मोठी केंद्रे राहतात आणि ती जोडली जातात. ' क्राईम अॅण्ड पनिशमेण्ट ' मध्ये रास्कोलनिकोफ, मार्मालादोफ आणि स्विद्रिगायलोफ ही कुटुंबे एकमेकांत गुंफली जातात, तर ' इडियट ' मध्ये येपान्चिन आणि इवोल्जिन ही कुटुंबे देवाणघेवाणीची आणि संबंधांची केंद्रे ठरतात. ' दि डेव्हिल्स ' मध्ये स्तावरोजिन, वेरहोवेन्स्की आणि लेब्यातकिन ही कुटुंबे एकमेकांत गुंतलेली राहत, तर ' ए रॉ यूथ ' मध्ये सोकोल्स्की दोलगोलकी आणि वेर्सिलोफचे अशी कुटुंबे एकत्रित येतात. या तंत्रामुळे दस्तएवस्कीतील विस्कळितपणा तगून जातो. हे संबंध जेव्हा कच्चे ठरतात, तेव्हा खरी 'गडबड' उडते. उदाहरणार्थ ' दि व्हिलेज ऑफ स्तेपानचिकोवो '. दस्तएवस्कीचे हे एकसंधता साधण्याचे तंत्र आधुनिक कादंबरीने उचललेले दिसत नाही. कारण युद्धोत्तर काळात -पहिल्या महायुद्धानंतर– युरोपातच नव्हे तर सर्वत्रच कौटुंबिक संबंध प्रत्यक्ष जीवनातच दाठरून गेलेले दिसतात. अर्थात अशा दाठरण्याची चाहूलही आपल्याला दस्तएवस्कीत लागते ती त्याच्या मुख्य पुरुषपात्रांच्या संदर्भात, त्याच्या ' अंडरग्राऊंड ' नायकांमध्ये.

याचा अर्थ असा नाही, की दस्तएवस्की कथा सांगण्याकडे दुर्लक्ष करतो. कथेला तो प्राधान्य म्हणावे तसे देत नाही, एवढाच याचा अर्थ. गुंतागुंतीची कथावस्तू (प्लॉट) आली, की तो काळजी घेण्याचा यत्न करतो; पण हा यत्न दुबळा ठरतो. ' ए रॉ यूथ ' हे त्याचे उदाहरण. त्याचे उपकथानक सहसा गुंतागुंतीचे नसते तर मुख्य कथानकावर प्रकाशझोत टाकणारे आणि सोपे असते. ' दि व्हिलेज ' मधील उपकथानक थोडे गुंतागुंतीचे आहे; पण या कादंबरीचे स्वरूपच मोलिएरच्या सुखान्तिकेसारखे असल्यामुळे ते सुसह्य ठरते. आणि मुख्य कथानकाला बाध आणीत नाही.

' पुनरावृत्ती ' हे दस्तएवस्कीच्या कादंबरीचे एक खास वैशिष्टय. पुनरावृत्ती तंतोतंत नसते तर रंग, आकार आणि क्वचित हेतू पालटून येते. म्हातारा आणि सुंदर तरुणी यांचे शरीरसंबंध, पांगळी मुलगी आणि तिचा उदात्त प्रियकर–मित्र यांची जोडी, फेफरे येणारा अर्धवट ' ननायक ' वाटणारा तरुण, पायाखाली पैसे किंवा वस्तू सात्त्विक संतापाने तुडविले जाणे, एकाच वेळी दोघांच्या प्रेमात पडणारे तरुण–तरुणी, लहान मुलाचा मृत्यू अशा काही गोष्टी दस्तएवस्कीच्या कादंबऱ्यांतून वारंवार येतात. प्रतिमांचेही तेच. अंधारी शवपेटिकेसारखी खोली, प्रचंड आकाराचा कोळी, भिंत, तळे, सूर्यास्त यांसारख्या प्रतिमा दस्तएवस्कीच्या जवळ जवळ प्रत्येक कादंबरीत डोकावतात. या प्रतिमा दस्तएवस्कीचे अगदी व्यक्तिगत अनुभव सूचित करतात.

दस्तएवस्कीच्या साहित्यविश्वातील त्या परिचित खाणाखुणा होत. थोर कलावंतांमध्ये अशी परिचित खाणाखुणांची पुनरावृत्ती बऱ्याच वेळा भेटते. आणि या खाणाखुणा कलाकृती ' यशस्वी ' ठरावी म्हणून येत नाहीत तर कलावंताच्या मनोरचनेचा

अनुक्रमणिका

आणि कलानिर्मितीचा जैविक सांधा जोडणाऱ्या म्हणून सहजगत्या येतात. मौज म्हणजे ज्या तुरुंगवासाने दस्तएवस्कीला माणसांचे इतके नमुने दाखविले आणि मानवी स्वभावाचे इतके सखोल ज्ञान करून दिले, त्या तुरुंगवासातील तपशील मात्र त्याच्या कादंबऱ्यांत कोठेही येत नाही. 'सैबेरियात त्याला कारावासात पाठविले गेले' या पालुपदावरच शेवट होतो. रास्कोलनिकोफ, मित्या, रोगोजिन, लॅबर्ट शेवटी तुरुंगात जातात आणि संपल्यासारखे होते. तेच मिस्कीन, पीटर किंवा आग्लाया यांच्या रशिया सोडून जाण्याचे.

दस्तएवस्कीची कादंबरी फार मोठ्या कॅनवसवर रंगविलेली नसते, जशी टॉल्सटॉयची असते. दस्तएवस्कीचे 'स्थळकाल' मर्यादित असतात. एकदोन गावे, शहरे आणि काही महिने एवढेच. दि व्हिलेज ऑफ स्तेपानचिकोवो हा सुरुवातीचा नमुना अखेरीपर्यंतचा नमुना ठरतो.

या गावाची, पंचक्रोशीची किंवा कालमर्यादेचीसुद्धा तपशीलवार, रसभरित वर्णने दस्तएवस्की करीत नाही, जशी टॉमस हार्डी त्याच्या वेसेक्स कादंबऱ्यांत करतो. दस्तएवस्कीच्या कादंबऱ्यांतील महत्त्वाच्या घडामोडी पीटर्सबर्गच्या एका भागात आणि त्याच्या पंचक्रोशीत घडतात. जे स्थलाबाबत तेच कालाबाबत. एका किंवा काही माणसांची संपूर्ण जीवनकथा किंवा चरितकथा सांगण्याचा घाट तो कधीही घालत नाही. व्यक्तींच्या जीवनातील विशिष्ट मर्यादित कालखंडातील घटनाच तो सांगतो. मर्यादित खंड ( स्पॅन ) घेतल्याने त्याला त्याचे सारे लक्ष व्यक्ती, त्यांचे स्वभाव, त्यांची अंतरंगे, त्यांच्यांतील नात्यांची गुंतागुंत यांवर केंद्रित करता येते. या अर्थाने त्याच्या कादंबऱ्या आणि इब्सेनची नाटके यांतील साम्य नजरेत भरण्याइतपत ठळक आहे. मर्यादित खंड ( स्पॅन ) निवडण्याचा आणखी एक फायदा दस्तएवस्कीला होतो. तो म्हणजे वाचक आणि त्याची पात्रे व थोडासा परिसर यांच्यात तो जवळीक सहजगत्या निर्माण करू शकतो. स्थलकाल आणि ही जवळीक यांच्याबाबतीत दस्तएवस्कीच्या अगदी विरुद्ध टोक आपल्याला कोठे सापडत असेल तर ते डॉस पॅसोस या या अमेरिकन कादंबरीकाराच्या 'यू. एस्. ए.' या त्रिखंडात्मक कादंबरीत होय. प्रदीर्घ कालावधी' विस्तीर्ण भूप्रदेश आणि शेकडो पात्रे ही या कादंबरी-त्रिपिटकाची वैशिष्ट्ये आहेत.

कथा सांगत असताना आणि 'रंगवीत' असताना दस्तएवस्की 'सर्वसाक्षी वृतान्तकार' गृहीत धरतो. 'मी' – 'I' – वापरून कथा सांगताना जिवंतपणा येतो तरी मर्यादा फार पडतात. त्यामुळे त्याने दोनचार ठिकाणीच प्रथमपुरुषी एकवचनी निवेदनाची पद्धत वापरली आहे. डेव्हिल्समध्ये जो 'मी' गृहीत धरला आहे, तो स्वतः लेखक नाही असे भासवून दस्तएवस्कीने थोडीशी अलिप्तता वाढविण्याचा यत्न केला आहे. येथील 'मी' प्रत्यक्ष घडामोडीत अर्थातच सहभागी होत नाही. 'अंडरग्राऊंड' मधील 'मी' मात्र खुद्द दस्तएवस्कीच वाटून जातो. त्यामुळे या कादंबरीला आत्मकथनाची डूब मिळालेली आहे. पण कादंबरी म्हणून ही सर्वांत कमी समाधानकारक आहे.

'मी' वापरून लिहिली गेलेली सर्वांत मोठी कादंबरी म्हणजे 'ए रॉ यूथ' ही होय. यातील मी म्हणजे आर्कादी हा कथानायक. हा प्रत्यक्ष घटनांत व घडामोडींत भाग घेतो, आणि अनेक घटना त्याच्या स्वतःभोवती फिरतात. ही कादंबरीदेखील अयशस्वी ठरलेली आहे. उलट, 'सर्वसाक्षी कथनकार' गृहीत धरून मांडलेल्या त्याच्या बहुतेक कादंबऱ्या छान वठलेल्या आहेत. मात्र या तऱ्हेच्या तंत्रात पात्रे व निवेदक आणि प्रसंग व निवेदक यांत जेवढे अंतर राहावयास हवे, तेवढे दस्तएवस्की राखताना दिसत नाही. त्याचा निवेदक फ्लोबेरप्रमाणे किंवा तुर्गेन्येफ्प्रमाणे अलिप्त वाटत नाही. तो मनाने कादंबरीत गुंतलेला–इनवॉल्वड्–वाटतो.

दस्तएवस्कीचे संवाद नेहमीच उत्कंठा वाढविणारे आणि कथेची उलगड करू पाहणारे असतात. या संवादांचा तोंडावळादेखील सुरुवातीच्या कादंबऱ्यांपासून अखेरच्या कादंबरीपर्यंत सारखा वाटतो. असा नमुनेदार संवाद आपल्याला प्रथम 'दि लॅण्डलेडी' मध्ये भेटतो :

'काल रात्री तुम्हाला काही ऐकू आलं का ?' तरुण माणसाने सुरुवात केली.

'होय तर.' वोरनिक उत्तरला.

'त्या गृहस्थांची भानगड तरी काय आहे ? ते करतात तरी काय ?'

'तुम्ही त्यांचेच भाडेकरू आहात नाही का ? मग या गोष्टी तुमच्या तुम्हीच पाहिल्या पाहिजेत. माझा त्यांच्याशी काही संबंध नाही.'

'तुम्ही माझ्या प्रश्नांची उत्तरे देणार की नाही ?' ओर्दिनोफ किचाळला. त्याच्या अवसादावस्थेतील चीड इतकी होती, की स्वतःवर त्याचा ताबाच राहिला नव्हता.

'अरेच्च्या ! यात माझी काय चूक ? चूक होती ती तुमची. तुम्ही कशाला तिकडे कडमडलात आणि त्या गृहस्थांना बिथरवलेत ? लक्षात ठेवा की त्यांच्या खाली राहणारा शवपेटिका तयार करणारा माणूस पुरा बहिरंभट आहे आणि तरीदेखील त्याने सर्व काही ऐकले. त्याची बायकोदेखील बहिरी आहे आणि तरीदेखील तिने सारे ऐकले. आणि पलीकडच्या भागातील मंडळींनीदेखील सारे सारे ऐकले. खरे म्हणजे मला जाऊन पोलिसांनाच बोलवून आणले पाहिजे.'

'ठीक आहे, मीही जाऊन एकाला घेऊन येतो' परसाच्या बाजूच्या दरवाजाकडे वळत ओर्दिनोफ म्हणाला.

'वाटेल ते करा. तुम्ही त्याचे भाडेकरू आहात... पण जरा थांबा साहेब, मिनिटभर थांबा.' ओर्दिनोफ मागे वळला. वोर्निकने डोक्यावरील टोपीस हात लावून मस्तक झुकविले.

'काय ?' तरुण माणसाने विचारले.

'तुम्ही जाणार असाल, तर मला मालकांकडे धाव घ्यावी लागेल.'

'ठीक आहे, मग पुढे ?'

'तुम्ही पोलीसात जाऊ नये हेच बरं.'

'गाढव !' दुसऱ्या वेळेला जायला निघालेला ओर्दिनोफ ओरडला.

'साहेब, साहेब ! एक मिण्टंच थांबा !' स्वतःचे दाताड दाखविणाऱ्या सोशिक वोर्निकने पुन्हा एकदा टोपीला हात लावला.

'साहेब माझे ऐका. घाई करू नका. बिचाऱ्या शिपुड्यांना कशाला त्रास ? देवाशप्पथ, त्यात काही अर्थ नाही.'

'बरंय, माझे ऐक. हे घे. आणि सांग तर मला त्या गृहस्थांची भानगड आहे ती.'

'भानगड काय आहे ती ?'

'अर्थात.'

'साहेब, पैसे दिले नसते तरी मी तुम्हाला ती सांगितली असती.'

वोर्निकने त्याचा कुंचा सरसावला. दोन-चार खराटे मारले. आणि मोठ्या गांभीर्याने आपली नजर ओर्दिनोफवर रोखली.

'साहेब, आपण फार छान आहात. परंतु त्याच्यासारख्या भल्या गृहस्थाच्या नादी तुम्ही न लागावं हेच बरं. तुमचं काम तुम्ही पाहा असाच सल्ला मी तुम्हाला देईन' त्या तातॅर कामगाराने सांगितले. त्या कळकळीच्या सांगण्यात रागाची छटादेखील होती. तो कामाला लागायच्या तयारीत होता. शेवटी गूढ असा भाव व्यक्तवीत तो ओर्दिनोफपाशी आला, त्याच्या शब्दांना तशाच बोलक्या हातवाऱ्यांची जोड देत तो म्हणाला,

'तो तसाच आहे.'

'म्हणजे ?'

'त्याचं डोस्कंच फिरलंय.'

'म्हणतोस काय ?'

'काही काही वेळेला त्याचे डोकेच ताळ्यावर राहत नाही' मघापेक्षा जास्तच आव आणून वोर्निकने पुन्हा सांगितले.

यानंतर वोर्निक, म्हातारा म्यूटिन हा गूढविद्यांत कसा पारंगत आहे, ज्योतिष कसे सांगतो आणि कोवळ्या तरुण कॅथरीनशी त्याचे संबंध कसे संशयास्पद आहेत हे ओर्दिनोफला निवेदन करतो. पण मागील पुढील संदर्भात प्रस्तुतचा संवाद अगदी स्फोटक ठरतो. गोष्टी वाचकाला कळतात पण त्या रहस्य उलगडत जावे तशा कळतात. विशेष मौज म्हणजे दस्तएवस्कीतील वैचारिक चर्चादेखील अशाच उत्कंठा वाढविणाऱ्या संवादतंत्र वापरून होतात. तुरुंगात असताना मित्याची आणि आल्येशाची जी संभाषणे होतात, ती किती 'स्फोटक' वाटतात ते पाहण्यासारखे आहे. अत्यंत समर्थ आणि प्रभावी संवाद हे दस्तएवस्कीचे बलस्थान आहे. जी वाक्ये एरवी एखाद्या निबंधात शोभतील, ती

दस्तएवस्कीय संवादांत विजेप्रमाणे चमकून आणि गडगडाट करून जातात.

दस्तएवस्कीची कादंबरी समर्थ आणि प्रभावी असते, पण फ्लोबेरएवढी कलात्मक नसते, तुर्गेन्येफ-इतकी शानदार नसते हे विधान चूक नाही. परंतु याचा अर्थ असा नव्हे, की दस्तएवस्की त्याच्या लिखाणावर मेहनत घेत नसे किंवा लिखाणाची क्रिया चालू असताना चिकित्साबुद्धी वापरत नसे. 'इडियट' कादंबरीच्या आठ रूपरेषा उपलब्ध आहेत. त्यांच्याकडे पाहिल्यास प्रत्येक गोष्टीचा तो किती बारीक विचार करीत असे हे सहज दिसून येते. प्रत्येक कादंबरी लिहिण्यापूर्वी तो भरपूर नोट्स काढीत असे ही गोष्टही आता माहीत झाली आहे.

सामान्यतः आजचा वाचक त्याच्या सर्वोत्कृष्ट दोन कादंबऱ्या प्रथम वाचतो. त्या म्हणजे 'क्राईम अॅण्ड पनिशमेण्ट' व 'ब्रदर्स कारामाझोफ'. फारच झाले तर 'इडियट' किंवा 'डेव्हिल्स' वाचतो. सर्वोत्कृष्ट साहित्यकृती वाचणाऱ्या वाचकाचे मन अक्षरशः भारावून जाते. इतके की दस्तएवस्की एक 'अवतारी' साहित्यिक होता याविषयी त्याच्या मनात शंका उरत नाही. कादंबरीकार म्हणून दस्तएवस्कीच्या सर्वश्रेष्ठत्वाविषयीही त्याची जणू खात्री पटते.

परंतु वस्तुस्थिती अशी आहे, की कादंबरीकार दस्तएवस्की अक्षरशः एखाद्या नदीप्रमाणे टप्याटप्प्याने हळूहळू मोठा व विकसित होत गेलेला लेखक आहे. त्याच्या प्रतिभेची झळाळी पहिल्यापहिल्या कादंबरिकातही प्रत्ययास येते, पण त्याची असामान्य थोरवी संथपणे हळूहळूच आकार धारण करीत जाते. या बाबतीत तो शेक्सपीयर किंवा इब्सेनप्रमाणे आहे.

तो जागरूक साहित्यिक आहे. अनेक प्रकारची स्वातंत्र्ये तो घेतो हे खरे असले, तरी तो पैलू न पाडलेला हिरा वगैरे नाही. कादंबरी हा त्याचा वाङ्मयप्रकार. तो समकालीनांच्या उत्तमोत्तम कादंबऱ्या वाचीत असे आणि त्यांतून घेता येईल ते निःसंकोचपणे घेत असे.

दस्तएवस्कीची कादंबरी स्पष्टपणे दाखविते की प्रतिभा, अनुभव, आणि तपश्चर्या (व्यासंग) या तीनही बाबतीत दस्तएवस्की कधीही कमी पडत नाही आणि या तीनही बाबतीत त्याच्या कादंबरीलेखनात 'उत्क्रांती' होत गेलेली आहे. उत्तरोत्तर विकास झालेला आहे. सुरुवातीस झपाटा आणि नंतर उत्तरोत्तर ऱ्हास हा प्रकार पाहायला सरावलेले मराठी डोळे दस्तएवस्कीकडे पाहताना विस्मयचकित होतात ते उगाच नाहीत. हळूहळू उंचीवर जावे तसतसे क्षितिज विस्तारत जाते हा अनुभव कालक्रमानुसार दस्तएवस्कीच्या कादंबऱ्या वाचीत गेल्यास जरूर येतो.

'क्राईम अॅण्ड पनिशमेण्ट' आणि 'ब्रदर्स कारामाझोफ' या दस्तएवस्कीच्या सर्वश्रेष्ठ कादंबऱ्या. आधुनिक साहित्यप्रेमी मंडळीचे जणू हे महाभारताचे खंडच होत. यांतील श्रेष्ठतम कादंबरी कोणती? चर्चा नेहमी होत असते. 'क्राईम'मध्ये आहे ते 'ब्रदर्स'मध्ये नाही. 'क्राईम'ला रचना आहे, सौष्ठव आहे, बरीचशी एकाग्रता आहे. कथेला गतिमानता आहे. दस्तएवस्कीची सर्व मुख्य समर्थ वैशिष्ट्ये तीत आहेत. ब्रदर्स ऐसपैस आहे. पण तिच्यातील तत्त्वचिंतनाची प्रगल्भता व उंची जास्त आहे. तिची आध्यात्मिक झळाळी मन प्रसन्न करते. आहे या स्थितीतही ती परिपूर्ण वाटते. जे रचनाकौशल्य आणि साहित्यकृतीचा घाट यांना जास्त महत्त्व देतात, त्यांना 'क्राईम' जास्त मोठी वाटते; तर जे वाचक मानवी जीवनदर्शनाच्या आणि तत्त्वचिंतनाच्या प्रगल्भतेला जास्त महत्त्व देतात, त्यांना 'ब्रदर्स' जास्त आवडते, मोठी वाटते.

'क्राईम'मध्ये निसर्ग जवळ जवळ नाही. ताण एवढा आहे की, निसर्ग आला तरी मन हलके होत नाही. 'ब्रदर्स'मध्ये निसर्ग तुलनेने जास्त डोकावतो आणि ताण कमी झाला नाही तरी दाहकता थोडी कमी करतो. लहान मुलांचे वेगळेच पण मनोज्ञ दर्शन 'ब्रदर्स' मध्ये घडते. तिचे ते एक सौंदर्यच आहे.

पण या दोन्ही कादंबऱ्या एकाच प्रकारच्या आहेत. खून, कारावास, पश्चात्ताप, नवजीवनाची हाक हीच त्यांची समाईक दिशा. दोन्हींतील नायकवजा मुख्य पात्र तरुण आहे. खून होतो तो वृद्ध माणसांचा. मुक्ती येते ती 'स्त्री'च्या रूपाने. स्विद्रिगायलोफ आणि स्मेर्दाखोफ यांच्या आत्महत्या समांतर आहेत. दोहोंतही 'लेख' लिहिण्याचे संदर्भ आहेत. खरा खुनी सुटण्याचेही दोन्हीकडे घडते. क्राईममध्ये तो होऊन कबुली देतो एवढेच. खून

झाल्यावर ' जिप्सींचे नृत्य ' व हॉटेलात जाणे दोहोंतही आहे. अशी अक्षरशः अनेक साम्ये हुडकता येतात. पण ' क्राईम 'मधील भडकपणा व दाहकता ' ब्रदर्स 'मध्ये नाही हे खास.

कादंबरीकार म्हणून दस्तएवस्कीचा प्रवास हे सिद्ध करतो, की तो एक फार गंभीर साहित्यिक आहे. मृत्यू, खून, आत्महत्या अशा घटनांची त्याच्या कादंबऱ्यांत कमतरता नाही आणि तरीही तो फार गंभीर कादंबरीकार आहे. याचा एक साधा अर्थ असा होऊ शकतो, की त्याच्या कादंबऱ्यांत ' तात्त्विक चर्चा ' येतात. हा अर्थ योग्यच आहे; पण तो किमान अर्थ आहे. कारण तात्त्विक चर्चा न येणाऱ्या कादंबऱ्यादेखील अनेक कारणांस्तव ' गंभीर ' असू शकतात. दुसरा अर्थ असा आहे, की त्याच्या लिखाणाचे उद्दिष्ट लोकांचे मनोरंजन करणे हे नाही किंवा जाणकारांच्या वर्तुळात वाहवा मिळविणे हे नाही. अनेक प्रथमदर्जाचे साहित्यिक या दृष्टीने ' गंभीर ' असतात. दस्तएवस्कीदेखील म्हटला तर आहेच.

परंतु दस्तएवस्की गंभीर साहित्यिक आहे याचा खरा अर्थ, मानवी जीवन, त्याचे आकलन आणि अन्वयार्थ व साहित्यनिर्मिती यांचे नाते किती खोलवर आणि किती उंचीवर नेता येईल याचे भान तो निग्रहाने आणि सातत्याने राखतो. जीवनविषयक नव्या धारणा आणि साहित्य यांची सर्जनशील सांगड घालण्याची अतिशय समर्थ धडपड तो करतो. ही धडपड तो मध्येच सोडून देत नाही. त्याचे कादंबरीलेखन हे एक जीवनकार्य–मिशन–ठरते, आणि वाढते.

या कार्याचा आधुनिक साहित्यावर आणि साहित्यिकांवर फार मोठा ठसा उमटावा यात नवल ते काहीच नाही. फ्लोबेरच्या शब्दांत, जे ' जगण्या ' साठी साहित्य वाचतात अशांसाठी दस्तएवस्कीच्या कादंबऱ्या आहेत.

**संदर्भ**

१ व २. ' दि इडियट ' अनुवाद : डेव्हिड मॅगरशॅक ( पेन्ग्विन ) १९५५ ची प्रस्तावना.



# विज्ञानविषयक पुस्तकांची भाषांतरे*

चंद्रकांत पाटील

प्रस्तुत निबंधाचा विषय हा "विज्ञानविषयक पुस्तकांची भाषांतरे" असा आहे. या निबंधात मराठीतील विज्ञानविषयक पुस्तकांच्या भाषांतराबाबत सुरवात, प्रेरणा, विकास इत्यादींचा त्रोटक स्वरूपात आढावा घेतलेला असून भाषांतराच्या काही समस्यांना स्पर्श करण्यात आलेला आहे.

मराठीतील विज्ञानविषयक पुस्तकांच्या भाषांतराचे श्रेय अव्वल इंग्रजी अमदानीतील काही इंग्रजी अधिकाऱ्यांनाच द्यावे लागते. एकोणिसाव्या शतकाच्या सुरवातीची सामाजिक-राजकीय-सांस्कृतिक पार्श्वभूमी लक्षात घेतल्यास वरील विधानाची कल्पना येऊ शकते. एकोणिसाव्या शतकाच्या आरंभापासूनच महाराष्ट्रात इंग्रजांनी आपले पाय रोवावयास सुरवात केलेली होती आणि तत्कालीन सामाजिक स्थितीमुळे त्यांना ही संधी आयतीच प्राप्त झाली होती. एकीकडे पेशवाईचा अस्त होऊ घातलेला होता, तर दुसरीकडे सामान्य लोकांना सुस्थिर जीवन जगण्यासाठी आवश्यक अशा वस्तूंचा तुटवडा, अशांततेचे थैमान, न्याययंत्रणा कोसळून पडलेली, लष्करी शिपायांनी सामान्यांना पिळण्यास सुरवात केलेली, ब्राह्मणी वर्चस्वामुळे धार्मिक अवनती सुरू झालेली, सर्व व्यापारपेठा परकीयांनी व महाराष्ट्रीयेतरांनी काबीज केलेल्या, परावलंबन पराकोटीला पोचलेले इत्यादी अनेक कारणांमुळे इंग्रजांना इ. स. १८१८ मध्ये आपल्या साम्राज्याची मुहूर्तमेढ रोवण्यास हा काळ आणि हा समाज आपोआपच साहाय्यक ठरला. इंग्रजांनी सत्ता हस्तगत केल्यानंतर त्यांनी भावी काळाची तरतूद म्हणून नव्या जीवनमूल्यांचा सुरवातीला मुक्तपणे व नंतर सीमित प्रसार करण्यासाठी आवश्यक ती मोर्चेबंदी करण्यास सुरवात केली. इंग्रजांच्या यशस्वितेची कारणमीमांसा करणाऱ्या सर्व विचारवंतांनी व समाजसुधारकांनी इंग्रजांच्या या आधुनिक व पुरोगामी जीवनदृष्टीच्या वर्चस्वाचाच उल्लेख केलेला आहे. इ. स. १७५९ नंतर झालेल्या औद्योगिक क्रांतीनंतर युरोपात आणि विशेषतः ब्रिटनमध्ये ज्या नव्या युगाची सुरवात झालेली होती, त्या युगाचा पाया मुळातच लोकशाही, सामाजिक समता, व्यक्तिस्वातंत्र्य, ऐहिक सौख्य इत्यादी पाश्चिमात्य मूल्यांवर आधारित होता. या मूल्यांच्या मुळाशी बुद्धिप्रामाण्यवाद आणि विज्ञाननिष्ठा होती. याउलट, भारतीय आणि विशेषकरून १९ व्या शतकाच्या सुरवातीच्या महाराष्ट्रीय समाजात बऱ्याचशा मध्ययुगीन मूल्यांचेच वर्चस्व होते. आत्यंतिक व आंधळी धर्मनिष्ठा, श्रद्धायुगातील आचार-विचारांना कवटाळून बसण्याची प्रवृत्ती, जात व वर्णाधिष्ठित समाजरचना, नवीन विचार व कल्पनांबाबतची संपूर्ण उदासीनता, ऐहिक सुखापेक्षा आध्यात्मिक कल्पनांचा अतिरेक इत्यादी बाबींमुळे मध्ययुगीन संस्कृतीच्या सर्व अवशेषांनी हा समाज "निष्काम" व "अकर्मयोगी" झालेला होता. तेव्हा अशा लोकांमध्ये राज्य करणे अत्यंत धोक्याचे आहे असा विचार काही सूज्ञ ब्रिटिश राज्यकर्त्यांच्या मनांत डोकावणे शक्य आहे. आणि यामुळेच कंपनीसरकारचा प्रतिनिधी म्हणून मुंबई इलाख्याची सूत्रे हाती घेणारा माउंट स्टुअर्ट एल्फिन्स्टनने या समाजाला सुजाण करण्यासाठी मराठी भाषेतून युरोपियनांना अवगत असलेल्या विज्ञानादी शास्त्रांचे शिक्षण द्यावयाच्या भूमिकेचा सुरुवातीपासूनच

* दिनांक ६ व ७ डिसेंबर १९८२ रोजी पुणे येथे 'नॅशनल बुक ट्रस्ट इंडिया' तर्फे संयोजिलेल्या परिसंवादात वाचला गेलेला निबंध, संयोजकांच्या सौजन्याने नवभारतात प्रसिद्ध करीत आहोत.
—संपादक





अवलंब केला. एल्फिन्स्टनच्या अविरत प्रयत्नांमुळेच महाराष्ट्रात नवशिक्षणाला आरंभ झाला. नव्या संस्कृतीचा परिचय होण्यास सर्वसामान्यांना मदत झाली आणि सुमारे १०० वर्षांच्या कालावधीत विज्ञानादी शास्त्रांचा मराठी भाषेत विलक्षण प्रसार होऊन एक नवी पिढी उदयाला आली आणि तिने स्वातंत्र्यप्रेम व देशीयतेचा जोरदार पुरस्कार केला.

प्रारंभीच्या काळात ईस्ट इंडिया कंपनीच्या भवितव्याबद्दल अत्यंत जागरुक असलेल्या कंपनीच्या नियामक मंडळाने भारतीयांमधे रूढ असलेले पारंपरिक शिक्षण आणि नव्या पाश्चिमात्य ज्ञानावर आधारित शिक्षण यांचा व्यावहारिक संगम करण्याचे धोरण अवलंबिलेले होते. यामुळे बहुतेकांची भूमिका ही एतद्देशीयांना कला व समाजशास्त्राचेच अधिक प्रमाणात शिक्षण द्यावे व विज्ञानाला फारसे प्राधान्य देण्यात येऊ नये, अन्यथा वैज्ञानिक ज्ञानामुळे एतद्देशीय पूर्णपणे बुद्धिप्रामाण्यवादी व विज्ञाननिष्ठ होतील व त्याची परिणती इंग्रजी वर्चस्व झुगारून देण्यात होईल अशीच होती. पण एल्फिन्स्टनसारख्या सूज्ञ, दूरदर्शी, ज्ञानलालसा असलेल्या व ज्ञानप्रसारासाठी तळमळीने झटणाऱ्या उदारमतवादी राज्यकर्त्यांमुळेच विज्ञानाच्या प्रसारालाही प्रारंभ झाला. इ.स. १८१३ मध्येच एल्फिन्स्टनने ईस्ट इंडिया कंपनीला पाठवलेल्या खलित्यात "पाश्चात्य विज्ञान शिकविण्यासाठी शाळा काढाव्यात आणि शिक्षणाच्या उच्च शाखांत सुधारणा करावी", "देशी भाषांतून पदार्थविज्ञानावर पुस्तके तयार करवून ती प्रकाशित करण्याची व्यवस्था करण्यात यावी" व सर्वांत महत्त्वाचे म्हणजे येथील लोकांना ज्ञानविज्ञान शिकण्यासाठी सतत प्रोत्साहन द्यावे अशा स्वरूपाच्या मूलगामी सूचना होत्या. याच ध्येयांनी प्रेरित होऊन एल्फिन्स्टनने पुढे विज्ञानविषयक पुस्तकांची मुद्दाम भाषांतरे करवून घेतली. अशा पुस्तकांचा १९ व्या शतकातील इतिहास श्री. कृ. भि. कुलकर्णी यांनी "आधुनिक मराठी गद्याची उत्क्रांति" (१९५६) या पुस्तकात दिलेला आहे. शिवाय त्यांच्याच "पाठ्यपुस्तकांची भाषांतरे" या निबंधात याबाबतचे विस्तृत विवेचन आलेले आहे [ पहा : मराठी वाङ्मयाचा इतिहास : खंड चौथा (इ. स. १८०० ते १८७४) संपादक : रा. श्री. जोग, १९६५, म. सा. प. प्रकाशन ].

एल्फिन्स्टनने आपल्या ज्ञानप्रसाराच्या आग्रहामुळेच मुंबईला "हिंदशाळा शाळापुस्तक मंडळी"ची स्थापना केली, आणि या शाळापुस्तक मंडळीकडून शिक्षणप्रसाराच्या उद्देशाने मराठीतून ग्रंथनिर्मिती करण्यासाठी विविध योजना आखल्या. असे ग्रंथ येथील सर्वसामान्य लोकांना जी भाषा समजते त्या भाषेतच, म्हणजे मराठीतच, लिहावेत असा एल्फिन्स्टनचा आग्रह होता. त्यासाठी त्याने अशा ग्रंथकर्त्यांना प्रोत्साहन मिळावे म्हणून "ग्रंथांची भाषांतरे किंवा नवीन ग्रंथ करणारांस बक्षिसविषयीचे प्रसिद्धीपत्र" १८२५ मधे प्रसिद्ध केले. यात गणित, शिल्पकला, ज्योतिष, सिद्धपदार्थविज्ञान, रसायन, शारीर, वैद्यक इत्यादी विषयांच्या शालोपयोगी ग्रंथांची भाषांतरे करणे किंवा नवीन ग्रंथ लिहिण्याबाबत विनंती असून अशा ग्रंथकर्त्यास शंभर ते पाच हजार रुपयांपर्यंतची पारितोषिके देण्याबाबतची सूचना होती. याच पत्रकात भाषांतरकर्त्याने कोणत्या गोष्टींचा प्रामुख्याने विचार करावा, याबाबत काही मार्गदर्शक तत्त्वेही सांगितलेली होती. त्याबाबतचा खालील उतारा आजही भाषांतरकर्त्यांना मार्गदर्शक होऊ शकतो :

"प्रौढ भाषेचे शब्द घालून दाटून अवघड करु नये. आणि जर त्या भाषेंत हावेत तसे शब्द मिळत नाहींत तर ते त्यांच्या मूळ भाषेंतून घ्यावे. ते असे कि मराठी गुजराथी यांस संस्कृतांतून आणि हिंदुस्थानीस अस्सल पारशींतून शब्द घ्यावे. कदाचित् देशभाषेंत किंवा–मूळ भाषेंतही जा अर्थास रुढ किंवा यौगिग शब्द लागत नाहींत तेथे इंग्रजी शब्दही घेतल्यास चिंता नाही" ( "ग्रंथांची भाषांतरे किंवा नवीन ग्रंथ करणारांस बक्षिसविषयीचें प्रसिद्धपत्र", १८२५, पृ. ५, 'पाठ्यपुस्तकांची भाषांतरे" मध्ये उदधृत केलेले अवतरण पहा : मराठी वाङ्मयाचा इतिहास, १९६५, पृ. १०४). याच प्रसिद्धीपत्रामुळे मराठीत विज्ञानविषयक ग्रंथांच्या भाषांतरास फार मोठ्या प्रमाणात सुरवात झाली. आणि या शतकाच्या मध्यावधीत कित्येक ग्रंथांची भाषांतरे होऊन अनेक पर्यायी पारिभाषिक शब्द मराठीत रूढ झाले. जॉर्ज जार्विस, टॉमस कँडी, जॉर्ज

मेक्लेनन, विलियम् हेन्री बेल या परदेशी विद्वानांनी आणि हरि केशवजी पाठारे, केरो लक्ष्मण छत्रे, नारायणशास्त्री चौलकर, गोविंद गंगाधर फडके, सखाराम रामचंद्र दीक्षित, कृष्णशास्त्री चिपळूणकर इत्यादी एतद्देशीय विद्वानांनी अनेक पुस्तकांची भाषांतरे करून विज्ञानविषयक ज्ञानाचा प्रसार करण्यात बहुमोल साहाय्य केले.

या लेखकांमध्ये हरि पाठारे यांचे कार्य अतिशय महत्त्वाचे आहे. संस्कृत व इंग्रजीचा उत्तम व्यासंग असलेले हरि केशवजी हे शाळापुस्तक-मंडळीचे १८३१-१८५१ पर्यंत सभासद होते. त्यांनी इतर अनेक पुस्तकांसोबतच "सिद्धपदार्थविज्ञानविषयक संवाद" (१८३३) आणि "रसायनशास्त्रविषय संवाद (१८३७) ही दोन अत्यन्त महत्वाची पुस्तके मराठीत आणली. सिद्धपदार्थविज्ञानाच्या अनुवादात तो मुळातच मराठीत लिहिलेला ग्रंथ असावा इतकी उत्कृष्ट शैली तर होतीच, पण त्याशिवाय त्यांनी भौतिकीतील अनेक पारिभाषिक शब्दांना उत्कृष्ट मराठी पर्याय दिले. "चल" हा मूळ धातू घेऊन त्यापासून उच्चलन, उच्चालक, चालकत्व, उच्चाल्य असे अनुक्रमे "लिव्हर", "पावर", "मोमेंट्स" "वेट" शब्द कसे निर्माण करावेत याची दिशाच दाखवून दिलेली होती. शिवाय त्यांच्या भाषांतराचा आणखी एक विशेष गुण म्हणजे त्यांनी ब्रिटिश स्थान, व्यक्ती, संकेतादींसाठी एतद्देशीय संदर्भ घेऊन मराठीकरणाची प्रक्रिया सुरू केली होती. त्यांचा हा प्रयत्न रसायनशास्त्राच्या भाषांतरात मात्र अपुरा पडला आणि त्यांनी इंग्रजी शब्दांचे आज उर्दू किंवा हिंदीत असलेल्या प्रचलनाप्रमाणेच मराठी रूप लिहिले. उदाहरणार्थ इलेक्ट्रिसिटी, कलारिक, नैत्रोजन, कार्बान धातु, हैड्रोजन इत्यादी. विज्ञानातील या विविध संकल्पना एकंदर मराठी संस्कृतीस अगदीच नवीन असल्यामुळे हा कालखंड भाषान्तराच्या दृष्टीने मुख्यत्वेकरून पारिभाषिक शब्द तयार करण्याचाच होता. त्या दृष्टीने पाहता विलियम् हेन्री बेल याने नारायणशास्त्री चौलकरांच्या मदतीने "शिल्पविद्या या विषयाचे निबंध" (१८५६) प्रकाशित करून शिल्पविद्येच्या परिभाषेचा पाया घातला. जॉर्ज जर्विसचे कार्य अत्यंत महत्त्वाचे आहे. जर्विसने जगन्नाथशास्त्री क्रमवन्त व रामचंद्रभट अभ्यंकरांच्या मदतीने गणितशास्त्रावर शालोपयोगी ग्रंथ भाषांतरित करून गणितशास्त्रातील परिभाषा तयार केली. यातही "कर्तव्यभूमिती", "आदिकरण भूमिती" अशा शब्दांसोबतच लॉगरिथमसाठी "लाग्रतम"-सारखा शब्द आलेला आहे. जर्विसने नव्या शब्दांसाठी संस्कृतचाच वापर केलेला होता. त्यामुळेच "रिडक्शन ऑफ डेसिमल्स" साठी "रूपभेद"-सारखा सुंदर प्रतिशब्द, फॅक्शन्सला "अपूर्णबीज", "इनफिनिट सिरीज्" साठी "अनंतश्रेणी", "इन्व्हाल्यूशन" साठी "घातकर्म", "मूलकर्म" असे सोपे प्रतिशब्द निर्माण झाले. जॉर्ज जर्विसप्रमाणेच डॉ. जॉन मॅकलेनन या "नेटिव्ह मेडिकल स्कूल"च्या सुपरिंटेंडेंटने "औषध-कल्पनाविधि" (१८२८), "निदान" (१८२८) इत्यादी ग्रंथांसोबत "शारीर" (१८५२) हा अत्यन्त महत्वाचा ग्रंथ भाषान्तरित करून वैद्यकशास्त्रातील परिभाषेचा पाया घातला. बाळशास्त्री जांभेकर यांनीही खगोलशास्त्रावर पुस्तके लिहून अनेक नव्या पारिभाषिक शब्दांची निर्मिती केली.

या प्रयत्नांनंतरचा आणखी एक उल्लेखनीय प्रयत्न म्हणजे हॉवर्ड याने १८५६ मध्ये स्थापन केलेली क्रमिक-पुस्तक-समिती. या समितीत मेजर टॉमस कँडी, डॉ. विल्सन, जॉन हार्कनेस, रे. मिचेल, भास्कर दामोदर पाळंदे, गोविंद नारायण माडगावकर, वि. वा. कीर्तिकर, वि. ना. मंडलिक, दादोबा पांडुरंग तर्खडकर इत्यादी सदस्य होते. पण या समितीतर्फे पाळंदे यांचे पहिले पुस्तक सोडल्यास बाकीची सर्व पुस्तके मे. कँडीनेच लिहिली. मेजर कँडीचा मुद्दाम उल्लेख करण्याचे कारण असे, की कँडीनेच मराठी भाषेचे प्रमाणीकरण करून त्याकडे विशेष लक्ष पुरविले. मे. कँडीला मराठी भाषेची विलक्षण तळमळ होती. म्हणूनच त्याच्यावर झालेल्या कठोर टीकेसही न जुमानता त्याने आपले कार्य चालू ठेवले. त्याची भाषांतराबाबतची भूमिका खालील उताऱ्यावरून स्पष्ट होते : "आता मी इतकेच सांगतो की, ज्या भाषांतर करणाऱ्यांविषयी, मी वर लिहिले आहे ते इंग्लिश भाषेतल्या चालीप्रमाणे मराठी लिहिणे जर सोडून देतील, तसेच कोंकणातच ज्या बोलण्याच्या रीती आहेत त्या व बोलण्याच्या इतर

वाईट चाली आहेत त्या सर्व मोडून जर चांगले ग्रंथ लिहितील तर ह्यांचे ग्रंथ चांगले आहेत असे मी आपले मत देण्यास अगदी तयार आहे." ( मे. टॉ. कँडी, "ज्ञानोदय"कर्त्यास पत्र, पुणे, २३।१।१८५८ ) ( पहा : "विश्रब्धशारदा" सं. ह. वि. मोटे, १९७२, ह. वि. मोटे प्रकाशन, खंड पहिला. )

मराठीतील विज्ञानवाङ्मयाच्या भाषांतराचा हा काल खालील गोष्टींमुळे महत्त्वाचा ठरतो. १. विज्ञानासारख्या पूर्णतया अपरिचित असलेल्या ज्ञानाच्या क्षेत्राची मराठी भाषिक लोकांना ओळख करून देणे, २. त्यासाठी इंग्रजीत उपलब्ध असलेल्या क्रमिक पुस्तकांची मराठीत भाषांतरे करवून घेणे, ३. भाषांतरासाठी आवश्यक ती परिभाषा मराठीत निर्माण करून ती रूढ करण्याचा प्रयत्न करणे, ४. परिभाषेसोबतच पुस्तकासाठी आवश्यक अशी प्रमाणभाषा निर्माण करण्याचा व बोली भाषांचा वाटेल तसा अनियंत्रित वापर टाळण्याचा प्रयत्न करणे, ५. परिभाषेसाठी वहिवाटीतील मराठी शब्द किंवा संस्कृत शब्द वापरणे, तेही उपलब्ध नसल्यास मूळ इंग्रजी शब्द जसे-तसेच देवनागरीत लिहिणे इत्यादी. असे असूनही या काळात इतर शास्त्रांच्या मानाने विज्ञानाची भाषांतरे खूपच कमी झाली. जी झाली तीही अगदीच प्राथमिक स्वरूपाची माहिती मराठीत आणण्यापुरतीच. शिवाय नव्या जीवनमूल्यांचा स्वीकार करण्यासाठी योग्य ती मनोभूमी तयार करणे व विज्ञाननिष्ठेचा आणि बुद्धिप्रामाण्यवादाचा अवलंब करण्यास, उद्युक्त करणे एवढ्या सीमित हेतूंनीच बहुतेक भाषांतरे झालेली होती. पुढील कालखंडात हा सुरवातीचा जोम अनेक सामाजिक-राजकीय कारणांमुळे कमी कमी होत गेल्याचे त्या काळातील पुस्तकांच्या सूचीवरून ( पहा : दाते यांची सूचि, राजवाडे यांचे तत्कालीन ग्रंथांचा आढावा घेणारे लेख. ) लक्षात येते. एक तर मराठीवरील अकृत्रिम प्रेमापोटी सतत धडपडणारे ब्रिटिश अधिकारी पुढेपुढे-विशेषत: विसाव्या शतकात-अभावानेसुद्धा दिसून येत नव्हते. शिवाय इंग्रजांनी आपले पाय रोवून सुरवातीचे उदारमतवादी धोरण सोडून दिल्यामुळे विज्ञानविषयक ग्रंथांची वा त्यांच्या भाषान्तराची गळचेपीच होत गेली. स्वातंत्र्यानंतरच हा प्रश्न निकालात निघेल आणि आपली विज्ञानविषयक साहित्यसंपदा संपन्न होईल असा विश्वास व्यक्त करण्यापलीकडे या काळात विशेष उल्लेखनीय असे काहीच घडले नाही. या काळात म्हणजे विसाव्या शतकाच्या पूर्वार्धात विज्ञानाचे शिक्षण हळूहळू प्रगल्भ होऊ लागलेले होते आणि विज्ञानशिक्षणाच्या कक्षा वाढत चाललेल्या होत्या. वैद्यकशास्त्र, स्थापत्यशास्त्र, अभियांत्रिकी, विविध उद्योगधंद्यांसाठी आवश्यक असणारी भौतिकी व रसायनशास्त्रादी शास्त्रांचा झपाट्याने प्रसार होत असतानाच दुसऱ्या बाजूने या शाखांचे माध्यम इंग्रजी करण्यात आले; इतकेच नव्हे, तर इंग्रज साहेबांच्या पदरी चाकरी करून स्वत:चा उत्कर्ष साधू इच्छिणाऱ्या मूठभर वरिष्ठ लोकांनीही इंग्रजी माध्यमासच सतत मान्यता दिल्यामुळे व ते आत्मसात केल्यामुळे मराठीतील विज्ञानविषयक वाङ्मयाची खूपच उपेक्षा झाल्याचे दिसते.

स्वातंत्र्यानंतरच्या काळात भाषेचा प्रश्न सुटेल, देशी भाषांना तात्काळ राजमान्यता मिळेल आणि मराठीतील विज्ञानविषयक वाङ्मय समृद्ध होईल, देशोदेशीतील उत्तमोत्तम, विज्ञानविषयक वाङ्मयाची मराठी भाषांतरे उपलब्ध होतील आणि एका नव्या विज्ञानाधिष्ठित बुद्धिप्रामाण्यवादी समाजाची निर्मिती होईल, अशी स्वप्नं रंगवणाऱ्या लोकांच्या पदरी काही पडले आहे असे आजही– म्हणजे स्वातंत्र्यानंतरची ३०–३५ वर्षे उलटून गेल्यानंतरही –वाटत नाही. आजही आपल्याला अजून भाषेसारख्या मूलभूत आणि गंभीर समस्येतून नीटपणे सुटता आलेले नाही. याची कारणे आपल्या राष्ट्रीय जीवनात घट्टपणे रुतून बसलेल्या इंग्रजी वसाहतवादाच्या आगंतुक मुळांत आहे, ही गोष्ट सारासार विचार करणाऱ्या सर्वांच्याच सहजपणे लक्षात येणारी आहे. इंग्रजांचा वसाहतवाद हा वरकरणी उदारमतवादाचा बुरखा पांघरलेला आणि म्हणूनच अतिशय विषारी, अतिशय घातुक होता. ज्या वसाहतीवर पूर्णपणे अवलंबून राहायचे आणि जिचे शोषण करायचे ती वसाहत नामशेष होऊ नये याची काळजी घेण्याच्या इराद्यानेच इंग्रजांनी आधुनिकता आणि उदारमतवादी धोरण स्वीकारलेले होते. अर्थात याला एल्फिन्स्टन, हॉवर्ड, मेजर टॉमस

अनुक्रमणिका

कॅंडीसारखे सन्मान्य अपवाद होतेच, हें वर आलेच आहे. १९व्या शतकाच्या अखेरीस आणि विसाव्या शतकाच्या पूर्वार्धात इंग्रजांनी इंग्रजी भाषेतून शिक्षण देण्याबाबतची आपली भूमिका काटेकोरपणे राबवली आणि एका संसर्गजन्य रोगाचा फैलाव आपल्या गुलामी वृत्तीच्या मध्यमपक्षी उच्चवर्णीयांमध्ये आणि या शास्त्रांच्या कृपाछत्राखाली भरभराट घेऊ इच्छिणाऱ्या वर्गामध्ये मोठ्या प्रमाणावर सुरू केला. इंग्रजीवर पोसलेल्या या पिढीने आपली सर्व सांस्कृतिक पाळेमुळे तोडून टाकली आणि इंग्रजी ही विश्वभाषा आहे, इंग्रजीशिवाय ज्ञानाच्या कक्षा वाढत नाहीत इत्यादी भ्रम फैलावण्यास सुरुवात केली. दुर्दैवाने स्वातंत्र्यानंतरही सत्तेवर आलेल्या मूठभर लोकांनी आपल्या विशाल बहुभाषी देशात इंग्रजीशिवाय तरणोपाय नाही असा अपसमज रूढ करून शासनाची व राज्यकारभाराची भाषा म्हणून इंग्रजीलाच प्रतिष्ठा दिली आणि देशी भाषांना दुय्यम स्थान मिळाले. इंग्रजीच्या या पोकळ युक्तिवादामागे संख्येने अत्यल्प अशा विशिष्ट वर्गाने ४०–५० कोटी लोकांवर बिनधास्त राज्य करण्याची कुटिल राजनीती ही गोष्ट राम मनोहर लोहियांसारख्या दूरदर्शी विचारवंतांनी आयुष्यभर सांगितली तरी त्यांचा आवाज इंग्रजी कोलाहलात कुठल्याकुठे दबून गेला, ही अतिशय दुर्दैवी बाब आहे. अशा परिस्थितीत विज्ञानविषयक ग्रंथांची व त्यांच्या भाषांतराची कामे म्हणजे निव्वळ रिकामपणचा उद्योग अशीच सामान्य धारणा झाल्यास आश्चर्य वाटू नये. इंग्रजीच्या वर्चस्वाचे गुणगान गाणाऱ्या या गुलामी वृत्तीच्या मूठभर लोकांनी आपली सत्तास्थाने अबाधित राखण्यासाठी असंख्य जागी विविध पातळ्यांवर संघर्ष पेरून ठेवले. शहरांविरुद्ध खेडी, सर्वसामान्य जनतेविरुद्ध नोकरशाही, देशी संस्कृती विरुद्ध इंग्रजी संस्कृती, पूर्व विरुद्ध पश्चिम, साहित्य व सामाजिक शास्त्रांविरुद्ध विज्ञानशाखा इ. इ. या अखेरच्या संघर्षाचा परिणाम म्हणूनच इंग्रजी माध्यम हटवण्याच्या मोहिमेला आपल्याकडील विज्ञान शाखेच्या लोकांनी पराकोटीचा विरोध केला. त्यांच्या विरोधाची काही महत्त्वाची कारणे अशी : एक म्हणजे देशी भाषांतून विज्ञान शिकवण्याच्या प्रक्रियेमुळे आपले विद्यार्थी इंग्रजीतील विज्ञानाच्या सतत वाढत जाणाऱ्या ज्ञानापासून वंचित होतील, त्यामुळे वैज्ञानिक प्रगती खुंटेल आणि राष्ट्रावर अनिष्ट परिणाम होईल; आणि दुसरं कारण देशी भाषांतून विज्ञान शिकवण्याइतक्या देशी भाषा संपन्न नाहीत. तिसरं, देशी भाषांना अजूनपर्यंत आपला पारिभाषिक शब्दसंग्रह वाढवता आला नाही व निश्चितही करता आला नाही. इंग्रजीची हकालपट्टी केल्यास "संस्कृत" सारख्या मृत व क्लिष्ट भाषेकडे वळावे लागेल व त्यामुळे आकलनक्षमता कमी होईल. इंग्रजीच्या उच्चाटनामुळे राज्याराज्यांत भाषिक संवाद होऊ शकणार नाही व भाषिक अनागोंदी माजेल इत्यादी, इत्यादी.

थोडासा सखोल विचार केल्यास या सर्व युक्तिवादातला फोलपणा लक्षात येईल. इंग्रजीच्या उच्चाटनामुळे वैज्ञानिक प्रगती थांबेल असे म्हणणाऱ्यांच्या हे का लक्षात येत नाही, की जगातल्या कुठल्याही राष्ट्राने आपली भाषा सोडून इंग्रजीचा वा अन्य परकीय भाषेचा अवलंब केलेला नाही, व त्यामुळे त्यांचा वैज्ञानिक विकासही थांबलेला नाही. चीन, जपान, रशिया, जर्मनी, फ्रान्स, झेकोस्लोवाकिया, पोलंड इत्यादी कितीतरी राष्ट्रे इंग्रजीशिवाय वैज्ञानिक क्षेत्रात संपन्न झालेली आहेत. त्यांनाही देशी भाषांची अडचण सुरवातीला जाणवली असेलच; पण त्यांनी त्यावर पर्याय शोधून काढलेच, आणि त्यांच्या भाषा संपन्न केल्याच. फक्त आपल्यालाच ते पर्याय सापडत नाहीत. चीनमध्ये जेव्हा हा संघर्ष निर्माण झाला, तेव्हा त्यांनी शिक्षण काही काळापुरते थांबवून सर्व ख्यातनाम प्राध्यापकांना जगातल्या विज्ञानविषयक उत्तमोत्तम पुस्तकांचे चिनी भाषांतर करायला लावले, आणि मगच खंडित करण्यात आलेले महाविद्यालयीन शिक्षण सुरू करण्यात आले. आजही हे चालू आहे. माझ्या माहितीतला एक चिनी प्राध्यापक गेल्या वर्षभरापासून बर्लिनच्या फ्री युनिवर्सिटीत "इम्यूनॉलजी"वर संशोधन करून ती ज्ञानशाखा आत्मसात करतो आहे. त्याला चिनी सरकारने इम्यूनॉलजीवर क्रमिक पुस्तकातला काही भाग स्वतंत्रपणे लिहिता यावा किंवा भाषांतरित करता यावा म्हणून ही दोन वर्षांची शिष्यवृत्ती दिलेली आहे. आणि हे फारच बोलके आहे. इतर भाषांचे निराकरण करीत बसणे फारसे महत्त्वाचे नाही. परिभाषेचा प्रश्न काढून विज्ञानविषयक




अनुक्रमणिका



ग्रंथांच्या निर्मितीबद्दल उदासीन होणे किंवा राहणे असेच हास्यास्पद आहे. अव्वल इंग्रजी अमदानीत-सुद्धा विज्ञानविषयक भाषांतरासाठी जो प्रश्न सामंजस्याने सोडवण्यात आलेला असतो, तो स्वातंत्र्यानंतर का गंभीर व्हावा, हे कळणे कठीण आहे. दक्षिणा प्राइस कमिटीच्या अहवालात कृष्णशास्त्री चिपळूणकरांनी तो सोडवला, हॉवर्डनं तो सोडवला होता, बाळशास्त्री जांभेकर, दादोबा पांडुरंग, मे. कँडी, हरि केशव पाठारे इत्यादिकांनी त्याबाबत वेळोवेळी आपली भूमिका मांडून सोडसला होता; पण हितसंबंधाचे राजकारण करणाऱ्यांना आणि शास्त्रीय संशोधनाचा " करिअर "-साठीच उपयोग करणाऱ्यांना मात्र परिभाषेची कल्पनाच भयंकर वाटते, हे फारच दुर्दैवी आहे. भाषा वापरल्याशिवाय संपन्न होत नाहीत, प्रवाही होत नाहीत, ही वस्तुतः अतिशय ढोबळ गोष्ट आहे. देशी भाषांतून बऱ्याचदा ऐकलेल्या, वाचलेल्या शब्दांमुळे परिभाषा सोपी व कमीत कमी शक्तीचा वापर करावयास लावणारी ठरेल. देशी भाषांमुळे आकलनशक्ती वाढून विज्ञानाचा झपाट्याने प्रसार होईल आणि शिकण्याची व विचार करण्याची भाषा एकच झाल्यामुळे विज्ञानासोबतच वैज्ञानिक दृष्टिकोनही वाढीस लागून सामाजिक-राजकीय क्षेत्रांतली अवनती थोपवण्यास मदत होईल. म्हणून फार मोठ्या प्रमाणावर विज्ञानाच्या ग्रंथांचा मराठी भाषेत अनुसर करून व नंतर स्वतंत्र ग्रंथनिर्मिती करून देशी भाषांना संपन्न करणे आणि संशोधनापर्यंतचे सर्व शिक्षण देशी भाषांतून करणे इत्यादी एक महत्त्वाचा पर्याय आहे.

आता मधल्या काळात म्हणजे स्वातंत्र्योत्तर काळात असे प्रयत्न झालेच नाहीत असे नाही. अनेक व्यक्ती व संस्थांनी हे कार्य अविरत चालू ठेवलेले होते. या दृष्टीने मराठीतल्या महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे कार्य लक्षणीयच आहे. मंडळाच्या उद्दिष्टांमध्येच " मराठीत अन्य भाषांतील उत्कृष्ट ग्रंथांची भाषांतरे प्रकाशित करून मराठी वाङ्मयाच्या समृद्धीस मदत करणे " आणि " शास्त्रीय तांत्रिक विषयांवर, त्याचप्रमाणे सामाजिक शास्त्रे आणि मानव्यविद्या या विषयांवर विचारपूर्ण पण सुटसुटीत ग्रंथांची निर्मिती करणे " अशा दोन उद्दिष्टांचा इतर अनेक उद्दिष्टांबरोबरच समावेश करण्यात आलेला होता. त्याप्रमाणे सा. सं. मंडळाने काही उत्कृष्ट विज्ञानविषयक पुस्तकांची भाषांतरे करवून घेऊन प्रकाशित केली. बट्रांड रसेलच्या " रिलीजन अँड सायन्स " या पुस्तकाचा वि. वा. कुवाडेकर यांनी केलेला "धर्म आणि विज्ञान" हा अनुवाद, हान्स रोट्खनबाखच्या ' राइझ ऑफ सायंटिफिक फिलॉसफी " या पुस्तकाचा प्रा. ग. वि. कुंभोजकर यांनी केलेला अनुवाद इत्यादींची भाषांतरे सोपी व महत्त्वपूर्ण आहेत. मात्र साहित्य संस्कृती मंडळाने प्रकाशित केलेल्या अनुवादांत प्रत्यक्ष विज्ञानाऐवजी वैज्ञानिक दृष्टिकोनावरील पुस्तकांवरच अधिक भर दिल्यासारखा वाटतो. प्रत्यक्ष विज्ञानविषयक ग्रंथांच्या भाषांतराला उत्तेजन देण्याऐवजी त्या त्या विषयावर मराठीत स्वतंत्रपणे पुस्तके लिहून घेण्याला महत्त्व देणारी विद्यापीठ ग्रंथनिर्मिती मंडळ ही संस्थाही मराठीतून ग्रंथनिर्मिती करण्यासाठी निर्माण झालेली आहे. याबरोबरच विज्ञानविषयक पुस्तकांच्या भाषांतराच्या क्षेत्रात नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया या संस्थेने अत्यंत स्पृहणीय कार्य केलेले आहे. अगदी बालांपासून ते प्रौढांपर्यंत सर्वसामान्यांना ज्ञान व रंजनाच्या दृष्टीने उपयुक्त ठरणाऱ्या अनेक पुस्तकांचे अनुवाद एन्. बी. टी. ने केले असून ते गाजलेलेही आहेत. " आपले वृक्ष ", " भाज्या व फळभाज्या ", " भारतीय सर्प " इत्यादी विषयांवरील पुस्तकांचा विशेष उल्लेख करावा लागेल. याशिवाय ज्या पुस्तकाचा मुद्दाम उल्लेख करावा ते म्हणजे रिची काल्डरच्या " सायन्स मेक्स् सेन्स " या पुस्तकाचे श्री. द. लिमये यांनी केलेले " विज्ञानाचा अन्वयार्थ " हे भाषांतर. १९६३ साली एन. बी. टी. ने प्रकाशित केलेल्या या पुस्तकाची नव्याने आवृत्ती काढावी इतके हे पुस्तक वाचनीय आहे. काल्डरची सोपी, ओघवती भाषा श्री. द. लिमये यांच्या भाषांतरातही टिकून आहे हे विशेष. या प्रयत्नांशिवाय चि. श्री. कर्वे, ना. वा. कोगेकर, पु. ज. देवरस, रा. वि. सोवनी इत्यादींचा उल्लेख या संदर्भात महत्त्वाचा आहे. १९५८ मध्ये डॉ. चिं. श्री. कर्वे यांनी केलेले लकॉम्ते द नॉयच्या "ह्यूमन डेस्टिनी" चे " मानवाचे भवितव्य " हे भाषांतरही लक्षात राहण्यासारखे आहे. ही यादी अर्थातच लांबत

जाणारी असली, तरीही अजूनही फारशी वाढलेली नाही.

अजूनही कितीतरी महत्त्वाचे ग्रंथ मराठीत आलेले नाहीत. उदाहरणार्थ, पेंग्विनने प्रकाशित केलेल्या "हिस्टरी ऑफ सायन्स" च्या बर्नोकृत चार खंडांचा अनुवाद मराठीत आवश्यक आहे. कितीतरी नव-नव्या विज्ञानशाखांवरील उत्तमोत्तम पाश्चात्त्य पुस्तकांचा अनुवाद मराठीतून होणे आवश्यक आहे. उदाहरणार्थ सायबरनेटिक्स, आधुनिक पारिस्थितिकी, प्रदूषण, रेण्वीय जीवशास्त्र इत्यादी कितीतरी गोष्टींचा उल्लेख करता येण्यासारखा आहे. स्वतंत्रपणे पुस्तके लिहिण्यापेक्षा अशा शाखांमधील अभिजात पुस्तकांची भाषांतरे निश्चितच महत्त्वाची व अधिक उपयोगी ठरतील. वैज्ञानिक ज्ञान आणि दृष्टिकोण सर्वसाधारण वाचकांपर्यन्त न्यावयाचा तर डेसमंड मॉरिसची आचारशास्त्रावरील पुस्तके, "सेल्फिश जीन" हे पुस्तक, जॉर्ज गॅमॉव्हचं "वन, टू, थ्री... इन्फिनिटी" हे पुस्तक, जेम्स वॉटसन या नोबेल लॅरिएटचे "द डबल हीलिक्स" हे पुस्तक, मनोद या आणखी एका नोबेल लॅरिएटचे "द चान्स अ‍ॅण्ड नेसेसिटी", आर्थर कोएस्लरचं "जानुस" आणि अशी असंख्य पुस्तके तातडीने मराठीत भाषांतरित करणे आवश्यक आहे. या कामी विद्यापीठांचेही फार मोठे साहाय्य होऊ शकते. आपल्याकडील प्राध्यापक निव्वळ आत्यंतिक ऐहिक भोगवादाच्या लालसेने "करिअरिस्ट" होण्यासाठी म्हणून अनुपयोगी संशोधनपत्रांची संख्या फुगवण्यात वेळ, पैसा व शक्ती नष्ट करीत असतात. त्यांनी दरवर्षी एखाद्या तरी उत्कृष्ट परदेशी विज्ञानग्रंथाचा मराठी किंवा अन्य देशी भाषेत अनुवाद केला आणि विद्यापीठांनीही त्याला संशोधनाइतकेच मूल्य काही काळ जरी दिले, तरीही प्रचंड उपयोगी कार्य होण्यासारखे आहे. शिवाय विज्ञानातील संशोधन देशी भाषांतून आणण्यासाठीही विद्यापीठांनी पाऊल उचलणे आवश्यक आहे. विज्ञानविषयक पुस्तकांसोबतच उत्कृष्ट परदेशी "विज्ञानकथां"चा अनुवादही महत्त्वाचा आहे. त्यामुळे सर्वसामान्यांना विज्ञानाची गोडी तर लागेलच, शिवाय आपल्याकडे प्रारंभापासूनच घसरणीला लागलेला इत्यादी प्रकार नीटपणे तडीला जाऊ लागेल. भा. रा. भागवतांनी किशोरांसाठी केलेल्या एखाददुसऱ्या विज्ञान-कादंबरीच्या अनुवादाचा अपवाद वगळता हे क्षेत्र अगदीच अस्पर्श राहिलेले आहे आणि आझॅक् अ‍ॅसिमॉव्ह, फ्रेड हॉयल, पेरे बूए, स्टुदगास्की अ‍ॅब्रॅमॉव्ह इत्यादींसारख्या प्रतिभावंतांच्या विज्ञानकथांपासून मराठी वाचक वंचितच राहिलेला आहे.

एकंदरीत विवेक, स्वातंत्र्य आणि न्यायाधिष्ठित मूल्यांचे आचरण करणारी पिढी निर्माण करणाऱ्या "वस्तूंच्या सर्वस्वापेक्षा त्यांच्या मूल्यांना अर्थ प्राप्त करून देणाऱ्या, बंधमुक्त समूहातील विवेकनिष्ठ नागरिक तयार करण्यासाठी साहाय्यशील ठरणाऱ्या आणि नागरिकत्व व स्वातंत्र्याच्या संयोगातून व्यक्तिगत सृजनक्षमता फुलवणाऱ्या" (पहा : आन्द्रे साखाराव्ह, "साखाराव्ह स्पीकर्स" सं. H. E. Salisbury, Collins/Fontana, 1985 ), जटिल क्लिष्ट व कठिण होत चाललेल्या समकालीन आयुष्यात जगण्याचा अर्थ प्राप्त करून देणाऱ्या उदारमतवादी शिक्षणपद्धतीची संकल्पना बेकन्, देकार्त, स्पिनोझा, ह्यूजपासून रसेल, चॉम्स्कीपर्यन्त अनेक विचारवंतांनी हळूहळू विकसित केलेली आहे. या शिक्षणपद्धतीला आधुनिक व समकालीन अधिष्ठान मिळविण्यासाठी विज्ञाननिष्ठेची नितांत आवश्यकता आहे. शिवाय आन्द्रे साखाराव्हसारख्या श्रेष्ठ वैज्ञानिकांनी सर्वस्व झुगारून ज्या "शान्तता, सहजीवन आणि बौद्धिक स्वातंत्र्या" च्या मूल्यांसाठी अहोरात्र संघर्ष केला. त्या मूल्यांच्या प्रस्थापनेसाठीही विज्ञानाधिष्ठिततेची, बुद्धिप्रामाण्यवादाची आवश्यकता आहे. त्यासाठी मराठीतून अधिकाधिक प्रमाणात विज्ञानविषयक ग्रंथनिर्मिती करणे आणि इतर पौर्वात्य व पाश्चात्त्य वैज्ञानिक पुस्तकांची भाषांतरे उपलब्ध करून देणे, याशिवाय दुसरा पर्याय नाही.








संत एकनाथदर्शन ( लेखसंग्रह ) संपा. हे. वि. इनामदार, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे; १९८३; पृ. ३६०; किं. ५० रु.

महाराष्ट्रातील श्रेष्ठ संत श्री एकनाथ महाराज यांच्या जीवनकार्याचे आणि वाङ्मयाचे विविध अंगांनी विवेचन करणारे काही अभ्यासकांचे लेख प्रस्तुत लेखसंग्रहात संकलित केलेले आहेत. पुण्यातील देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण शिक्षणोत्तेजक संस्था शिक्षणकार्यास विविध प्रकारे प्रोत्साहन देत असते. या संस्थेमार्फतच हा तिसरा ग्रंथ प्रसिद्ध करण्यात आला आहे. लेखांचे संपादन डॉ. हे. वि. इनामदार यांनी केले आहे. ह. भ. प. धुंडामहाराज देगलूरकर यांचा पुरस्कार या ग्रंथास लाभला आहे. ग्रंथातील आर्ट पेपरवरील दोन चित्रपृष्ठे पैठणमधील एकनाथांच्या वास्तूचे तसेच त्यांच्या पूजेतील विजयी पांडुरंगमूर्तीचे दर्शन घडवतात. प्रस्तुत ग्रंथात हे. वि. इनामदार, सुहासिनी इर्लेकर, भीमराव कुलकर्णी, डॉ. वसंत जोशी, उषा देशमुख, चंद्रकांत घांडे, यू. म. पठाण, रत्नाकर मंचरकर, प्रा. श्री. परांजपे, व. कृ. वऱ्हाडपांडे इत्यादींचे विविध विषयांवरील उद्बोधक व अभ्यासपूर्ण लेख आहेत. अरविंद टिकेकरांनी तयार केलेली नाथसाहित्याची सर्वांगीण व अद्ययावत सूची तसेच ग्रंथगत उल्लेखांची सूची इत्यादी अंगांनी प्रस्तुत ग्रंथ अभ्यासकांच्या दृष्टीने अत्यंत उपयुक्त केलेला आहे. नाथांचे जीवनकार्य आणि साहित्य यांबद्दल अद्ययावत विवेचन आणि माहिती प्रस्तुत ग्रंथातून वाचकाला मिळू शकते.

प्रस्तुत ग्रंथातील विविध प्रकारच्या १९ लेखांपैकी काही लेख उल्लेखनीय आहेत : नाथांचे ' रुक्मिणी स्वयंवर ', ' भावार्थ रामायण ', ' नाथ साहित्याचे भाषिक विशेष ', ' एकनाथ आणि मुक्तेश्वर ', ' पैठण आणि परिसर ' इ. लेख अभ्यासपूर्ण आहेत. ह. भ. प. धुंडामहाराजांची प्रस्तावना आणि डॉ. इनामदार यांचा उपसंहार यांतून सामान्यतः नाथांच्या जीवनकार्याची आणि वाङ्मयाची पूर्वोत्तर परंपरा, वारकरी परंपरेतील नाथांचे माहात्म्य इ. विषयांसंबंधी सामान्यपणे जे विचार रूढ झालेले आहेत, त्यांचा उत्तम प्रकारे परिचय होतो. नाथांचे चरित्र, व्यक्तिमत्त्व, काव्यविशेष आणि कार्य यासंबंधीचा एखादा नवा दृष्टिकोन मांडण्यापेक्षा परंपरागत सर्वमान्य दृष्टिकोनच बहुतेक लेखांतून सामान्यतः दिसून येतो.

ह. भ. प. धुंडामहाराजांनी आपल्या पुरस्कारात एकनाथांची विचारपद्धती, त्यांच्या श्रद्धा, त्यांचे पौराणिक माध्यम, सामाजिक विचार इ. गोष्टी आजच्या काळात अप्रस्तुत वाटण्याची शक्यता व्यक्त करून या सर्वांना नाथांच्या काळाचा संदर्भ आहे, याकडे वाचकांचे लक्ष वेधले आहे. या श्रेष्ठ संताच्या जीवनकार्याची कालोचित अन्वर्थकता शोधण्याचा प्रयत्न होणे आवश्यक आहे. या दृष्टीने प्रस्तुत ग्रंथातील ' नाथ साहित्याचे भाषिक विशेष ' ( मुकुंद श्री. रानडे ) व ' नाथ साहित्याची सांस्कृतिक फलश्रुती ' ( भीमराव ब. कुलकर्णी ) हे लेख उल्लेखनीय आहेत. सुहासिनी इर्लेकर आणि उषा देशमुख यांचे अनुक्रमे नाथांचे रुक्मिणी स्वयंवर आणि अभंगवाणी या विषयांवरील लेखही पाहण्यासारखे आहेत.

तथापि, संत आणि त्यांचे जीवनसाहित्य यांच्याकडे महाराष्ट्राच्या सांस्कृतिक परंपरेच्या जडणघडणीच्या दृष्टीने पाहणे विद्यमान काळात इष्टही ठरेल आणि आवश्यकही आहे. संतकाळाच्या ऐतिहासिकतेचे भान राखूनही मराठी संस्कृतीला विशिष्ट मूल्यकल्पनांचे अधिष्ठान देण्याचे कार्य संतांनी व्यक्तिशः आणि सांप्रदायिक पातळ्यांवर

अनुक्रमणिका






केले, त्याचा मागोवा घेणे अधिक उद्‌बोधक ठरणारे आहे. यासाठी सांस्कृतिक विचाराची एक निश्चित अशी चौकट आवश्यक आहे आणि त्यासाठीही समाजाची प्रकृती, भौतिक परिसर, सामाजिक रचना, सांस्कृतिक स्तर, आर्थिक व्यवस्था, राजकीय विचारप्रणाली आणि शासनसंस्थेचे स्वरूप यांसारख्या विविध अंगांनी सांस्कृतिक दृष्टिकोनाची संदर्भपरिभाषा निश्चित करावी लागेल. व्यक्ती आणि समाज व्यक्ती आणि इतिहास, व्यक्ती आणि संस्कृती यांसारख्या संबंधांचा संकल्पनात्मक व्यूहही निर्धारित करावा लागेल. या दृष्टीने पाहता काँटिनेंटल प्रकाशनातर्फेच दोन वर्षांपूर्वी प्रसिद्ध झालेला 'समर्थ दर्शन' हा ग्रंथ उल्लेखनीय ठरतो. 'समर्थ दर्शना'प्रमाणेच 'संत एकनाथ दर्शन' घडविणे ही विद्यमान काळाची मोठी गरज आहे. तरीदेखील प्रस्तुत ग्रंथ त्या दृष्टीने प्रयत्न करण्यासाठी एक महत्त्वाचा आधारग्रंथ ठरतोच. म्हणून अभ्यासकांना तो महत्त्वाचा वाटेल, यात शंकाच नाही. काँटिनेंटल प्रकाशनाचे प्रमुख माननीय अनंतराव कुलकर्णी आणि त्यांचे चिरंजीव श्री. अनिरुद्ध कुलकर्णी यांनी संतप्रणीत महाराष्ट्राची सत्वधारा आपल्या प्रकाशनांनी सतत वाचकापर्यंत नेऊन पोचविण्याचे केलेले कार्य अत्यंत महत्त्वाचे आहे. हे कार्य अखंडपणे चालू ठेवण्याचा 'काँटिनेंटल संकल्प' प्रस्तुत ग्रंथामुळे स्पष्ट दिसतो.

—रा. ग. जाधव

---

**पाणभवरे**– आनंद यादव, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; १९८२; पृ. १९५, किं. ३१ रु.

---

जिथे कवितेचा प्रांत संपतो, तिथे ललित गद्याचा प्रांत सुरू होतो. याचा प्रसन्न अनुभव देणारे पुस्तक म्हणजे आनंद यादव यांचे पाणभवरे हे पुस्तक; असे या पुस्तकाच्या प्रथमवाचनातच सहज वाटून जाते. ललित लेखनातील लालित्याला काव्यात्मतेची डूब देण्याची यादव यांची खास शैली या संपूर्ण पुस्तकात विखुरलेली आढळून येते. विषयाच्या बाबतीत जाणवून येणारा नावीन्याचा अभाव यादव यांनी आपली भाषा आणि निरीक्षणे यांवर पेलल्याचे पाणभवरे वाचत असताना वारंवार जाणवत राहते. गावाकडच्या आठवणी, तिथला गोतावळा, लहानपणीच्या परिस्थितीचा आठव, सगेसोयरे, जोडीदार, त्यांचा लाघवीपणा आणि त्यांचा मागासपणा ह्या सर्वांचे काही ललित लेखांतून रेखीव दर्शन होते, तर अन्य लेखांतून शहरी संस्कृतीला सामोरे गेलेले यादव दिसतात. अर्थात दोन्ही ठिकाणी गहिवरलेपण आहेच.

घराकडचा रस्ता, ढोरं राखणी, मोटा रानातल्या मनातल्या, दादांची भाकरी, वानरांचा गाव, वस्तीचं घोंगडं, बहिणीचं लगीन हे सारे लेख गावाकडच्या आठवणी सांगणारे आहेत. त्याबरोबरच पैलवानकी यासारखा लेखकाच्या आयुष्यात घडून गेलेल्या पैलवानकीचे मिस्किल दर्शन घडविणारा लेख आहे. ह्या सर्वच ललितरम्य लेखांतून लेखकाच्या मनातील मातीची ओढ मनस्वीपणे प्रकट होताना दिसून येते. ह्यांपैकी वानरांचा गाव हा ललित लेख आणि मोटा रानातल्या मनातल्या हा दुसरा लेख विशेषलक्षात राहणारे आहेत. लेखकाचे भाषण ट्रॅन्झिस्टरवरून ऐकायला मिळणार या अपूर्व आश्चर्याने मामाच्या घरात जमलेली पोरं आणि माणसं ह्यांचे या वानरांचा गाव लेखात अत्यंत मोहक दर्शन घडून जाते. ट्रॅन्झिस्टर, एरिअल ह्या सान्याच बाबतीत तिथे अपूर्वाई आहे. ती अपूर्वाई यादव यांनी अत्यंत हळुवार शब्दांत टिपली आहे. तसेच मोटा रानातल्या मनातल्या या लेखाच्या बाबतीतही म्हणता येईल. यादवांच्या एकूण गावाकडील विविध दर्शनांना जी काव्यात्मता लाभली आहे, ती अगदी कवितेइतकी तरलस्पर्शी वाटते. हे यश खास करून त्यांच्यात दडून असलेल्या कवीचेच आहे, असे पाणभवरे वाचत असताना वाटून जाते.

हे लेख जसे गावाकडील आहेत, तसे काही लेख खास शहरी संस्कृतीचे आणि एकूण शहरी वळणाचे दर्शन घडविणारे आहेत. शेवटची माती, पाटी आणि पोळी, राष्ट्रीय महारस्ता, ममी असे हे लेख आहेत. ह्यांव्यतिरिक्त एक स्वदेशी प्रवास यासारखे एक साधकबाधक पण लेखकाच्या मनाचे दर्शन घडविणारे प्रवासवर्णनही या पुस्तकात संगृहित करण्यात आले आहे. ह्या लेखांतूनही यादवांच्या अनेक वाक्यांना ओळींचे सामर्थ्य प्राप्त झाल्याचे दिसून येते. उदा.–

अनुक्रमणिका

हो वेला तर काळोखी ओलीचिंब,
धारात नाहणारी,
मूक गारठलेली,
आत्ममग्न,
दुःखी आभाळगळ ( पान १२५ )

किंवा ' झाडाचीच जात ती. मुळे मातीत रुजणार, माती म्हणजे झाड आणि झाड म्हणजे माती.' ( शेवटची माती ) ( पान ११८ ) ह्यांसारखी अनेक वाक्ये यादव ह्या लेखात लिहून जातात. राष्ट्रीय महारस्ता त्यांना व्याकूळ करून सोडतो. जगायची पण सक्ती आहे आणि मरायची पण सक्ती आहे अशा मनस्थितीतून शहरातील भीषण वाहतूक व्यवहाराचे या लेखात अत्यंत बारकाईने केलेले वर्णन वाचकांना मुके करून सोडणारे वाटते.

एकूण एकोणीस ललित लेख या संग्रहात संगृहित करण्यात आले आहेत. ते यादव यांची लेखनप्रकृती प्रकट करणारे असेच आहेत. ललित गद्याची पुस्तके कथाकादंबरीच्या तुलनेत अगदीच मोजकी प्रसिद्ध होतात. यादव गेली काही वर्षे सातत्याने या प्रांतात लेखन करीत आहेत. पाणभवरे हे त्या लेखनाचेच सुखद दर्शन आहे. गावाकडील गहिरेपण आणि शहरातील रितेपण ह्या दोन्ही अनुभवांना या पुस्तकात एक सुरेख लय प्राप्त झाल्याचे दिसून येते. ह्यातून विषयातील नावीन्याचा अभाव फारसा लक्षातही येत नाही. अत्यंत सकस आणि तितकेच शैलीदार ललित लेख वाचल्याचे समाधान पाणभवरे हे पुस्तक निश्चितच देऊन जाते.

**– वैजनाथ महाजन**

---

'केशवराव जेधे' – ले. य. दि. फडके, प्रकाशक : श्री विद्या प्रकाशन, २५० शनिवार पेठ, पुणे ३०; मूल्य चाळीस रुपये; पृष्ठे २७८; १९८२.

---

श्री. फडके यांच्या या पुस्तकाने १९१९ ते १९५७ पर्यंतचा महाराष्ट्रातील, विशेषतः पुण्यातील सत्यशोधक ब्राह्मणेतर चळवळीचा एक साधार इतिहास प्रथमच उभा केला आहे. ' ऋणनिर्देश ' या लेखकीय आत्मनिवेदनात जेधे यांचे, विशेषतः सार्वजनिक जीवन साकार करण्याचा कोणत्या अभिनव



पद्धतीने प्रयत्न केला आहे, याची प्रथमच वाचकांना कल्पना दिली आहे. समकालीन वृत्तपत्रांतील उतारे, मुलाखती, जेधे यांच्या जीवनाशी संबंध आलेल्यांची चरित्रे, खुद्द जेध्यांची भाषणे, इतरांचा पत्रव्यवहार वगैरे मुबलक आधार वापरले आहेत. ' जागृति ', ' विजयी मराठा ' यांसारख्या ब्राह्मणेतरपक्षीय मुखपत्रांतूनच श्री. फडके यांनी त्यांच्या विधानांना पुरावे मिळविले आहेत. फडके तटस्थच राहिले आहेत.

प्रारंभी सोळा फोटो छापले आहेत. हे एक जेधे यांच्या जीवनाचे दर्शन वाटते. हा छोटा संग्रह एकत्रपणे वाचकास पहिल्यांदाच पाहावयास मिळतो. मोठा टाईप, छान मुखपृष्ठ, चांगला कागद व उत्तम छपाई या पुस्तकास लाभली आहे.

एकूण दहा प्रकरणांची योजना कौशल्याने केली आहे. जेधे यांचा काळ व कार्य यांचे लांबड न लावता जरूर तेवढेच दर्शन वाचकांना उपलब्ध केले आहे. १९२० ते १९५४ पर्यंत ' जेधे–जवळकर ', ' जेधे-मोरे ', व ' जेधे-गाडगीळ ' यांच्या संयुक्त सहकार्याने महाराष्ट्र गाजला व पुढेही गेला. या ज्या ' युत्या ' झाल्या त्यांच्यामधील मैत्रीचा व मतभेदांचाही इतिहास श्री. फडके यांचे हे पुस्तक पुरविते. ' जेधेमॅन्शन ' ही केशवरावांच्या जीवनाची पार्श्वभूमी ठरते असेच नव्हे, तर या काळात साऱ्या महाराष्ट्राचा व पुण्याचा इतिहास ' जेधेमॅन्शन '-मधून घडला. सन १८९६ साली जन्मलेले व इंटरपर्यंत शिक्षण घेतलेले केशवराव इ. स. १९१७ साली सत्यशोधक चळवळीत उडी घेते झाले. सर्व संसाराचा भार त्यांचे बंधू बाबूराव यांनीच शेवटपर्यंत वाहिला. शिवकालीन कान्होजी जेधे यांचा वारसा असलेल्या जेधे ह्या पुण्यातील प्रख्यात व श्रीमंत घराण्याशी कोल्हापूरच्या शाहूमहाराजांच्या राजकारणाचा पाठिंबा होता; १९२२ साली शाहू दिवंगत झाले तरी जेधे घराण्याने त्यांचे कार्य पुढे धैर्याने चालविले. ह्या कामी जेधेबंधूंना फार घस सोसावी लागली. तरुण केशवराव यांच्या कार्याची सुरवात सन १८९६ नंतर दहाबारा वर्षे बडोदे व कोल्हापूर येथील गाजलेल्या वेदोक्त प्रकरणानंतर झाली. सन १९२० साली केशवरावांचे लग्न शितोळेदेशमुख यांच्या घराण्यातील

वेणूबाई यांच्याबरोबर पुण्यास सत्यशोधक समाजमते झाले ( पृ. ४ ). श्री. फडके हे जेधे यांचे असे खाजगी चरित्र अधूनमधून सांगतात. पण जेधे सार्वजनिक आयुष्याला आमरण समर्पित असल्याने त्यांचा गृहस्थाश्रम व व्यक्तिजीवन सार्वजनिकच ठरले; संसार व प्रपंच गौण झाला. जेधे यांच्या ध्रुव मैत्रीचा आलेला निकोप अनुभव जो गाडगिळांनी वर्णिलेला आहे, तो मोठा चिंत्य आहे ( निवेदन, पृ. नऊ पहा ).

कर्मवीर महर्षी वि. रा. शिंदे १९२३ नंतर जेधेमॅन्शनच्या जवळ राहावयास आले. शिंदे व जेधेबंधूंचा परिचय वाढत गेला. केशवराव यांच्यावर शिंद्यांच्या राष्ट्रीय व गांधींकडे कल असलेल्या विचारांचा परिणाम वाढतच गेला. शिंदे हे प्रधानतः अस्पृश्योद्धारक समाजसुधारक असल्यामुळेही, जेधे यांच्यावर दलितोद्धाराचे संस्कार झाले. पर्वतीसत्याग्रहात जेधे यांनी भाग घेतला (पृ. १२६-२८). विठ्ठल रामजींच्या नेतृत्वाचे स्वरूप पृ.९ ते १३ पर्यंत श्री. फडके यांनी समर्पकपणे मांडले आहे. १९१७ ते १९२१ या काळातील विठ्ठल रामजींचे राजकारण जेधे यांनाही प्रथम मान्य नव्हते ( पृ. १० ). टिळकांच्या सामाजिक प्रतिगामी धोरणाचा जवळून परिचय झाल्यानंतर, शिंदे हे लोकमान्यांची उत्तरोत्तर विरोधी भक्ती करू लागले (पृ. १३). जेधे १९१७ पासून शाहू पक्षाला धरून टिळकांना जोराचा विरोध करीत होते. शिंदे व जेधे जवळजवळ आले व जेधे शेवटपर्यंत गुरुवर्य शिंद्यांचे शिष्यच राहिले. शिंदे यांनी लिहिलेल्या स्वतःच्या आठवणींत व अन्यत्रही जो भाग आलेला नाही, तो कर्मवीर शिंदेसंबंधात बराच महत्त्वाचा भाग फडक्यांनी दिला आहे. हा फार महत्त्वाचा आहे.

श्री. फडके यांनी क्रमवार व तारीखवार आणि कालक्रमणिकेनुसार जेधेसंबंधित सार्वजनिक इतिहास लिहून मोठे यश मिळविले आहे. ८ जाने. १९२० रोजी पुणे येथे गाजलेली किर्लोस्कर थिएटरमधील सभेची हकीगत पृ. १४ वर दिली आहे. टिळकांच्या निधनाच्या अगोदर नेमस्त पक्ष व ब्राह्मणेतर पक्ष यांनी मिळून महाराष्ट्रात टिळकांना सडकून विरोध केला. चळवळीला उभयपक्षी क्रिया-प्रतिक्रियावादी स्वरूप आले. १९२० साली भवानी पेठेत शाहूमहाराजांच्या उपस्थितीत झालेल्या सभेत टिळकभक्तांनी दंगा केला (पृ. १६ ते १९). श्री. फडके यांनी तटस्थ राहून वरीलसारखी कित्येक नाजूक व वादग्रस्त प्रकरणे थोडक्यात एक, फार तर दोन परिच्छेद प्रत्येकास योजून वाचकांना सादर केली आहेत. हे यश आहे. सत्यशोधक–ब्राह्मणेतर चळवळीचा भासमान झालेला उदयास्त मूर्त केलेला आहे.

पृ. १८ ते २३ पर्यंत महाराष्ट्रातील ब्राह्मण–अब्राह्मणवादाचा जो भडका उडाला व परस्परांनी परस्परावर खटले-खोकले भरले त्याचे, विशेषतः सातारा जिल्ह्यातील पेटलेल्या वणव्याचे स्वरूप वाचावयास मिळते ( पृ. २०-२१ ). थोडक्यात शुद्धमनाने भाष्य करून फडके पुढे पुढे जातात. सत्यशोधक ब्राह्मणेतर चळवळ रोकण्याचे पुष्कळ प्रयत्न झाले.

अज्ञ बहुजनसमाज व पाटीलवर्ग यांच्यापुढे इतक्यात अस्पृश्यतानिवारणाचा कार्यक्रम ठेवला तर त्यांची तयारी नसल्याने ब्राह्मणेतरांत फूट पडेल व पक्षाचे नुकसान होईल, असे लठ्ठे-कोठारी यांचे ह्या काळात मत होते (पृ. ८). जेधे केशवराव ह्या मताचे नव्हते म्हणून त्यांनी महाडसत्याग्रह वगैरे आंबेडकरी चळवळीला पुढे पाठिंबा दिला (पृ. ९५–१००). जोतीबांची चळवळ शूद्रातिशूद्रांसाठी निघाली, पण त्यांच्या देखत व पश्चात ती फक्त विद्येत मागासलेल्या मराठी तत्समांसाठी प्रत्यक्षात झाली. यामुळे खेड्यापाड्यांतल्या जनतेचा अतिशूद्रविषयक तिरस्काराचा व उपेक्षेचा परंपरागत दृष्टिकोन अजूनही पुष्कळ शिल्लक आहे. फुले-शिंदे-शाहू यांना ह्या बाबतीत अनुसरणारे जेधे, भाऊराव पाटील यांच्या सारखी थोडी सुधारकमंडळी प्रत्यक्षतः ब्राह्मणेतर चळवळीला लाभली. पौरोहित्याचा हक्क-वेदोक्ताचा हक्क, नोकऱ्यांत, शिक्षणात व कौन्सिलात राखीव जागा मिळाव्यात यासाठी झगडणारे तळातील उपेक्षितांना जरूर लागणारी समता देण्यास पुष्कळ नाखूष होते (पृ. २४). यामुळे महाराष्ट्रात डॉ. आंबेडकरांना दलितांची स्वतंत्र चळवळ व पक्ष काढावा लागला. ६ मे १९२२ साली शाहू महाराज निधन पावले. यावेळी सातारा, वाई वगैरे क्षेत्रांत पेढे








वाटण्यात आले. फडक्यांनी केलेला वसईचा उल्लेख चुकीचा वाटला.

शाहू महाराजांना नव्या येणाऱ्या स्वराज्यातील सत्ता मूठभर लोकांकडे पुनः न जाता ती, बहुजन-समाजाकडे यावी व राहावी अशी काळजी होती (पृ. २३). पहिल्या युद्धात इंग्रजांना मराठा वीरांनी जे साह्य केले ते थोड्या कृतज्ञतेने इंग्रज सरकारपुढे होते. परक्या युरोपिअन युवराजाच्या हस्ते शिव-पुतळा उद्‌घाटित होणार म्हणून कर्मवीर शिंदे गैर-हजर राहिले. शाहू महाराजाच्या हयातीतच मराठा वीरांचे स्मारक, श्री. शिवाजी स्मारक व पाटील परिषद असे तीन उपक्रम पुण्यात यशस्वी प्रकारे पार पडले (पृ. २३). ह्या अगोदर श्री. शिवाजी मराठा सोसायटी स्थापन झाली. मराठ्यांची अस्मिता अपूर्वपणे जागी होऊन ती क्रियाशील झाली होती. शिक्षणप्रसाराचेही प्रयत्न चालू होते. हे पुस्तक जेधे यांच्या काळातील इतिहास सादर करीत आहे.

केशवरावांचा गट या वेळी पुणे म्युनिसिपालटीत अल्पमतात होता म्हणून जहाल, मवाल व ब्राह्मणेतर कित्येक सभासदांचे एकत्र बहुमत होऊन फुले पुतळ्यांचा ठराव फेटाळला गेला. सार्वजनिक हौद व नळ अस्पृश्यांनाही मोकळे करावेत असा जेध्यांचा ठरावदेखील नापास झाला. पुण्यात सनातनी पक्ष बळकट व बहुसंख्य होता.

" जोतीराव फुले तसेच चिपळूणकर–टिळक या आपआपल्या आराध्यदैवतांच्या अभिमानाने उभय पक्ष हिरीरीने घुळवड खेळत .." (पृ. ६७) परस्परांनी खेळलेल्या ह्या शाब्दिक बाणांची हकीगत कोणाचीही बाजू न घेता पृ. ८५ पर्यंत फडक्यांनी थोडक्यात वाचकांना सादर केली आहे. वरील झंझावाती, विलक्षण व पुण्यातील चमत्कारिक काळाचा हा फोटोच म्हणावा लागतो. " जेधे –जवळकर " हे वाद पेटण्यास कारणीभूत होते, तरी उभयपक्षांत जी गरमागरम वाफ साचली होती, ती बाहेर पडून गेली. या प्रकारचा इतिहास पुनः जशाचा तसा आवृत्त होणार नाही. म. फुले यांचा पुतळा पुणे म्युनिसिपालटीने पुढे उभारला व चालू ताज्या पिढीला लो. टिळक–चिपळूणकर व म. फुले एकसारखे वंद्य वाटतात. दरी भरून आली आहे. फुल्यांचे तर अगणित पुतळे झाले आहेत. जेधे यांना यश येण्यास वेळ लागला. १७ सप्टेंबर १९२५ रोजी जेधे यांचा निषेध करणारा ठराव कै. काकासाहेब गाडगीळ यांनीच मांडला होता. पण पुढे हे दोघे आमरण मैत्रीने राहिले (पृ. ७० व निवेदन पृ. नऊ). जेधे–जवळकर-लाड–बागडे यांच्यावरील खटले, धनवडे–प्रकरण वगैरेसंबंधी झाला तसा इतिहास फडके यांनी दिला आहे. जेधे–जवळकर यांना १४।९।२६ रोजी येरवडा तुरुंगात नेल्यावर गुरुवर्य शिंदे हे तटस्थ पुढारी-देखील त्यांना भेटावयास गेले (पृ. ७८). १९४८ साली शिंद्यांच्या अहिल्याश्रमातच डॉ. आंबेडकरांचा छप्पनावा वाढदिवस साजरा झाला. ह्या वेळी कै. शंकरराव मोरे यांनी आंबेडकरांची जी आठवण सांगितली, तिचा मूलाधार घेऊन ' देशाचे दुष्मन ' पुस्तकावरील सर्वत्र गाजलेला खटला डॉ. आंबेडकरांनी वकीलपत्र घेऊन त्यांच्या कुशाग्र बुद्धिमत्तेच्या जोरावर जिंकला, ही माहिती पृ. ८२ वर फडके यांनी उपलब्ध केली आहे, ती आजही चित्ताकर्षक वाटते. डॉ. आंबेडकरांनी कायदेकौन्सिलमध्ये प्रश्नही विचारले; पण पुढे जेधे वगैरेंनी ब्राह्मणेतर पक्षाचे विसर्जन करून कांग्रेसमध्ये जाणे केले हे आंबेडकरांना संपूर्ण अमान्य होते.

स्वातंत्र्यपूर्व काळातील पक्ष व त्यांचे सहकार्य व विग्रह यांच्या राजकीय सामाजिक कारणांचे तिढे व कोडी फडक्यांनी उलगडून दाखविली आहेत. मवाळ-पक्ष व ब्राह्मणेतरपक्ष या दोघांनी मिळून ' केसरी ' व टिळक पक्षाशी सहकार्याने लढत चालविली होती (पृ. १४). परंतु पुढे सत्यशोधकसमाजाच्या पुण्यातील चळवळीला तिखट व ब्राह्मण स्त्रियांवरील अत्याचाराचे स्वरूप येऊ लागले. धनवडे-प्रकरण यातून उद्भवले. नेमस्तांचे अग्रणी रँ. परांजपे यांनी ब्राह्मणांची बाजू घेतली; उत्तरोत्तर सर्वच नेमस्त हे ब्राह्मण समजले गेले व वरील संबंध तुटला (पृ. २१). केशवरावांनी ' रँग्लर्स रँगलिंज् ' नामक लेख कर्मवीर शिंदे यांच्याकडून लिहून घेऊन तो विजयी मराठ्यात प्रसिद्ध केला (पृष्ठ ८५). अवघड अवघड प्रकरणे शिळ्या कढीला पुन्हा बिलकूल ऊत न आणता फडक्यांनी हाताळली आहेत.




खटले व त्यांत घडलेला तुरुंगवास यामुळे केशवराव व त्यांच्या बरोबर जवळकर यांची ख्याती सर्व महाराष्ट्रात पसरली (पृ. ८७). सरकारधार्जिणे धोरण पुरस्कारणारे ब्राह्मणेतर पुढारी जाधवराव यांनी जेधे–जवळकरांच्या लोकप्रियतेचा फायदा घेण्याचे ठरविले व जाधव–जेधे–जवळकर यांची युती होऊन सत्यशोधक समाजाच्या प्रसारार्थ दौरे झाले. पण पुढे तिघे एकत्र नांदले नाहीत.

श्री. फडके यांच्या विवेचक पुस्तकाचा पूर्वार्ध येथे संपतो. मध्यंतरी ब्राह्मणेतर चळवळीतील जूट व फूट हे पाचवे प्रकरण चातुर्याने योजले आहे. जेधे स्पष्टवक्ते, निर्भिड व त्यागी होते. जाधवरावांची त्यांनी पर्वा न करिता कानउघाडणी तोंडावर केली. जेध्यांच्यावर इतरांच्या बाबतीत असेच प्रसंग येत गेले.

आतापर्यंत थोरले बंधू बाबूराव जेधे यांच्या आर्थिक पाठिंब्याखाली जेध्यांच्या सर्व चळवळी झाल्या, शिवस्मारकाचा वाद, छत्रपती मेळा, देशाचे दुष्मन पुस्तक, म. फुले पुतळा वगैरे गाजलेल्या प्रकरणांमुळे 'जेधे-जवळकर' जोडी महाराष्ट्रापुढे आली. जेधे केशवराव ह्या काळात पुणे म्युनिसिपालटीचे प्रसिद्ध सदस्य होते, लोकनियुक्त होते.

दुसऱ्या प्रकरणात पुण्यास होणारे छत्रपतींचे स्मारक मराठ्यांचे व्हावे अगर सर्वांचे व्हावे या वादाची हकीगत येते. शाहू महाराजांचे प्रथम मत 'मराठ्यांचे व्हावे' असे होते. पण त्यांनी सर्व महाराष्ट्राचे व्हावे या माधवमहाराज शिंदे यांच्या मतास पुष्टी दिली. ब्रिटनच्या युवराजास बोलावून युरोपिअनाच्या हस्ते कोनशिला बसविण्याचे ठरविल्यामुळे कर्मवीर शिंदे समारंभास हजर राहिले नाहीत (पृ. २८). श्री. फडके यांनी दृष्टिआड झालेल्या अशा पुष्कळ अनेक महत्त्वाच्या बाबी नजरेस आणलेल्या आहेत. उदा., शाहू महाराज वारल्यावर सातारा-वाई वगैरे ठिकाणच्या ब्राह्मणांनी पेढे वाटले. ही वादात तेल ओतणारी घटना पृ. २९/३० वर दिली आहे. यामुळेही शिवस्मारक कमेटीवर "ब्राह्मण नकोत" असे मत बळावलेले होते. दि. १६ जून १९२८ रोजी गव्हर्नरच्या हस्ते शिवाजी महाराजांचा अश्वारूढ पुतळा उभारण्यात आला. शिंदे व जेधे यांनी मागेच अंग काढून घेतले. जवळकरकृत 'शिवस्मारक पुराणा'तील कित्येक मर्मभेदी उतारे देऊन श्री. फडके यांनी संपविले आहे (पृ. ३८). वेदोक्त प्रकरणापेक्षा 'जेधे–जवळकर' यांची चळवळ महाराष्ट्रात दहापंधरा वर्षे गर्जत होती.

टिळक असताना शाहूपक्ष व केसरीपक्ष यांचे द्वंद्व जुंपले होते. पण स. शो. चळवळीस 'जेधे-जवळकर' जोडी मिळाल्यामुळे केळकर व त्यांचा केसरी पक्ष यांच्यांतही तीव्र लढा झाला. टिळकांनी गणेशोत्सवास राष्ट्रीय व सामाजिक स्वरूप आणल्यामुळे हिंदु-मुसलमान तेढ वाढेल अशी सरकारचीही समजूत होती. पण पुण्यातील मेळ्यांमुळे ब्राह्मण-अब्राह्मण-वादाचा भडका उडाला. जेधे यांच्या छत्रपती मेळ्यातील काही कडवट पद्ये श्री. फडके यांनी वाचकांना सादर केली आहेत (पृ. ४०, ४२, ४७). सार्वजनिक पैशातून टिळकभक्तांनी पुण्यात मंडईत टिळकांचा पुतळा उभारला. टिळक हयात असताना त्यांना विरोध करणाऱ्या सत्यशोधकांनी टिळक पुतळ्यालाही विरोध व्यक्त केला व पुणे म्युनिसिपालटीने तिच्या खर्चाने म. फुले पुतळा उभारावा असा जेधे यांनी ठराव मांडला. जेधेमॅन्शन व गायकवाडवाडा यांच्यांतील लढ्याची हकीगत फडके यांनी सादर केली आहे. धोण्डोपंत विद्वांस व तात्यासाहेब केळकर यांच्याशी न पटल्यामुळे रामभाऊ व श्रीधरपंत हे टिळकांचे दोघे पुत्र जेधे-जवळकर गोटात सामील झाले (पृ. ५६). ह्या टिळकपुत्रांनी राजभोज यांचा मेळा गायकवाडवाड्यात नेला व जेधे बंधूंनी त्यांच्या मारुतीच्या देवालयात ह्या मेळ्याला मंदिर-प्रवेश करू दिला (पृ. ५७). ह्या वर्णनपर प्रकरणात सामाजिक अशा अभूतपूर्व काही घटना आजही चिंतनीय वाटतात. सत्यशोधकांच्या जेध्यांच्या 'मजूर' पत्रास 'संग्राम' पत्रातून न. वि. गाडगीळ, ह. मो. जोशी, गोखले वगैरे उत्तरे देत होते (पृ. ६२). जेधे-गाडगीळ ही युती पुढे होईल असे ह्या काळात कोणासच वाटले नव्हते!

म. फुले यांच्या पुतळ्याला विरोध होत असता टिळक-चिपळूणकर यांच्यावर न भूतो न भविष्यति असा हल्ला करणारे 'देशाचे दुष्मन' नामक '

अनुक्रमणिका






श्री. जवळकर यांनी लिहिले. चिपळूणकरांनी निबंध-मालेत जोतीरावांवर उपहासप्रधान टीका केली नसती तर 'देशाचे दुष्मन' पुस्तक निघाले नसते (पृ. ६५). नगरपालिकेच्या सार्वजनिक पैशातून टिळक-चिपळूणकर यांचे पुतळे बसविण्यात आले, तसाच म. फुले पुतळा बसविला असता तर वाद विकोपास गेला नसता.

म. फुले पुतळाप्रकरणाच्या काळात ब्राह्मणेतरांतील राष्ट्रीय म्हणविणारी श्री. य. म. नलावडे आदी काही मण्डळी व खुद्द फुल्यांचे नातू बाबूराव फुले हे केसरी पक्षात सामील होऊन फुले-चरित्रहनन करीत होते ( पृ. ६६ ). म. फुले विस्मृत होते; पण जेध्यांच्या जागृतीमुळे त्यांचे एक मोठे चरित्र (पंढरीनाथ पाटीलकृत) जनतेपुढे प्रथम आले.

तुरुंगवास भोगल्यामुळे जेधे-जवळकरांची लोकप्रियता जनतेत वाढली. देशाचे दुष्मन पुस्तकाच्याकामी जेधे-बागडे यांची, डॉ. आंबेडकर यांच्या कुशाग्र वकिलीपणाने सुटका झाली तरी दुसऱ्या पुस्तकांच्यामुळे जवळकर व लाड यांना दण्ड व शिक्षा भोगावी लागली. 'देशाचे दुष्मन' पुस्तकासंबंधीचे चवथे प्रकरण विशेषतः जवळकरांच्या चरित्राचा भाग ठरते. जवळकरी जहाल लेखन जागृतिकर्ते पालेकर, दीनमित्रकार पाटील व खुद्द स. शो. समाजाचे विद्वान अध्यक्ष कै. जाधवराव यांना नामंजूर असे (पृ. ६५).

श्री. फडके यांनी सत्यशोधक जलसे व वरीलसारखी पुस्तके यांच्यांतील पातळी जी खाली घसरली होती, तिच्याबद्दल पृ. ५० वर स्वतंत्र विवरणार्थ स्वतःचा परिच्छेद योजिला आहे. " कनिष्ठ समजल्या जाणाऱ्या जाती किंवा वर्षानुवर्षे पायदळी तुडवले गेलेले लोकसमूह जेव्हा आपल्यावर झालेल्या अन्यायाविरुद्ध किंवा आपल्याला कंठाव्या लागणाऱ्या अपमानित जिण्याविरुद्ध चढाईचा पवित्रा घेतात तेव्हा त्यांच्या तोंडांतून ओव्या येण्यापेक्षा शिव्यांचा वर्षाव होणे हे स्वाभाविक असते... इ."

जेधे यांच्या ह्या फडकेकृत चरित्रात क्रियाप्रतिक्रियांचा ब्राह्मण–अब्राह्मण या महाराष्ट्रातील दुर्दैवी वादाचा इतिहास सापडतो. फडके यांचा याला नाइलाज आहे. एकूण सर्व पक्षांची पातळी फार खाली गेली होती व टिळकपक्षीय सुविद्य व कायदेनिष्णात भालाकार भोपटकर यांच्या विधानांबद्दलही केसरीकार केळकरांनी जाहीर माफी व्यक्त केली होती ( पृ. ४८–४९ ). जवळकरांना, गाडगिळांना व मोऱ्यांना जेध्यांची जरुरी लागली, यातच जेधे-चारित्र्याची व कार्याची महती आहे.

तत्त्वज्ञान व तत्त्वचिकित्सा करण्याचा ब्राह्मणेतर चळवळीतील तो काळ नव्हता. सबंध पुस्तकात सत्यशोधक समाज व ब्राह्मणेतर पक्ष एक का विभिन्न यासंबंधीची एक अल्प मीमांसा पृ. ८९ व ९० वर करण्याची वेळ एकदाच लेखकावर येते. काही विभिन्नता श्री. कालेकर गणपतराव यांनी दर्शविली आहे. पण जोतीबांच्या काळापासून दोन्ही चळवळी एकच होत्या असे स्वच्छ दिसते. 'ब्राह्मणेतर' शब्द व संज्ञा आता बुडाली आहे व म. फुले व सत्यशोधक समाजाची चळवळ यावर वाङ्मयात विचारविनिमय चालू असतो. फडके यांचे पुस्तक याचेच द्योतक आहे. लेखकीय निवेदन पान आठ व नऊवर प्रारंभी जेधे व्यक्ती व पुढारी यासंबंधीचे जे विवेचन खुद्द फडक्यांनी केले आहे ते यथातथ्य आहे.

जोतीबांचा " शूद्रातिशूद्र " हा समास स. शो. समाजाच्या स्थापनेनंतर प्रत्यक्ष मागे पडला व स. शो. समाजाची ब्राह्मणेतर, वरील सर्व चळवळ फक्त शूद्रांची झाली. अस्पृश्यतानिवारणाचा प्रश्न हाती घेतल्यास ब्राह्मणेतरांत फूट पडेल अशी व्यवहार्य समजूत ब्राह्मणेतर पुढाऱ्यांची होती(पृ.८). पुढे आंबेडकरांच्या महारवतन बिलाला काही ब्राह्मणेतर पुढाऱ्यांनी मुंबई कौन्सिलात मान्यता न देता विरोध केला. तेव्हा ब्राह्मणेतरांच्या भीतीचा अर्थ आंबेडकरांना प्रत्यक्ष समजून आला व त्यांचा पक्ष स्वतंत्र होत गेला. स्वतःच्या समाजाची सामाजिक–राजकीय सत्ता सोडण्यास ब्राह्मण तयार नव्हते, तसे दलितांना समान वागणूक देण्यात ब्राह्मणेतर राजी नव्हते. फडके यांनी चवदार तळयाच्या प्रकरणाचे विवरण करून हा मुद्दा नजरेस आणिला आहे ( पृ. ९५ ते १०० ). जेधे, शिंदे, भाऊराव पाटील यांच्यासारखी व्यापक दृष्टीची अस्पृश्योद्धारक पुढारीमंडळी थोडीच होती. ह्या काळात जवळकर म्हणजे जेधे व जेधे म्हणजे जवळकर असा अर्थ होता; समास होता. कॉंग्रेसमध्ये जवळकरही गेले

व ते शेवटी जेध्यांची मैत्री पुनः धरावी असे इच्छित होते.

## जूट व फूट

आतापर्यंतचा इतिहास एकजुटीचा होता. फडक्यांना यापुढे फुटींचा अन्वयार्थ करावा लागला फडक्यांची भाषा सर्वत्र सोपी व बालबोध आहे. जूट व फूट हे प्रकरण ८७ ते १४४ अखेरपर्यंतची पाने व्यापिते. अनेक घटना, प्रसंग यांचे दर्शन देणारे हे दीर्घ विवाद्य प्रकरण वाचकांपुढे उभे करण्यात श्री. फडक्यांनी असामान्य यश पादाक्रांत केले आहे. हा ग्रंथ फडक्यांनी त्यांचे श्वशुर श्री. पांडुरंग काशिनाथ दाते यांना अर्पण केला आहे.

ब्राह्मणेतर चळवळ असहकारवादी नव्या गांधींच्या चळवळीस रोखण्यास उपयोगी ठरेल असा गव्हर्नर लेस्ली विल्सन यांच्यासारख्यांचा मनोदय होता हे सत्य फडक्यांनी भास्करराव जाधव यांच्याच भाषणाचा व पत्राचा जिवंत आधार घेऊन पृ. ९० व ९१ वर विवेचिले आहे. पुण्याचे सेशन्स जज्ज लॉरेन्स यांनी देशाचे दुष्मन पुस्तकावरील दाव्याचा दिलेला जेधे–जवळकरांच्या बाजूचा निकाल केसरीकर्त्यांना अर्थात पटला नाही. जुटीपेक्षा सर्वत्र फुटीचा विचारप्रपंच फडक्यांना करावा लागला आहे. उदा., कै. अच्युत बळवंत कोल्हटकर, श्रीधरपंत टिळक व त्यांचे बंधू रामभाऊ हे जेधे–जवळकर पक्षास मिळाले व डॉ. आंबेडकरांच्याही जवळ गेले. ही मनोवेधक घटना पृ. १०० वर आहे. एक एक प्रकरण व एक एक घटना स्वतंत्र पुस्तिकेचा भाग होऊ शकणारी असूनही त्यांचा जरूर तेवढा प्रपंच करून फडके कौशल्याने पुढे जातात. जाधव-जवळकर एक होऊन चालविलेले ' कैवारी ' पत्र शिंदे कर्मवीर व जेधे केशवराव ह्यांनादेखील चावा घेते झाले. शिंदे यांनी त्यांची बाजू मजबूत प्रकारे मांडली होती. कर्मवीर शिंदे यांच्या मार्गदर्शनाप्रमाणे जेधे वगैरे काँग्रेसमध्ये बहुसंख्येने घुसले हे खरे; पण सत्यशोधक समाजाची नीट व्यवस्था लावा, तो बरखास्त करू नका हा उपदेश सर्वच सत्यशोधकांना कधीच परवडला नाही.

इंग्रजसरकारची वर्षानुवर्षे तळी उचलणारे राजकीय मुत्सद्दी भास्करराव जाधव साहेबाच्या कृपेस राहून मंत्रीपदे पटकाविते झाले (पृ. ९०). पण यापुढे महर्षी शिंदे यांच्या जहाल राजकारणाला अनुकूल काळ येऊ लागला. ब्राह्मणेतरांतील तरुणांनी ४सप्टेंबर १९२४ रोजी जेधेमॅन्शनमध्ये म. गांधींना पानसुपारी केली. लो. टिळकांना ब्राह्मणेतर पक्षाचे मन जिंकता आले नव्हते. उलट, टिळक निष्कारण व व्यर्थ विरोध ओढवून घेत. गांधींच्या आगमनामुळे महाराष्ट्रातील काँग्रेसमधील ब्राह्मणी वर्चस्व उत्तरोत्तर संपुष्टात येऊ लागले. गांधी ब्राह्मणेतर होते, ह्या मुद्द्यालाही ब्राह्मणेतरांच्या मनात त्यावेळी स्थान होते. पुढे यशवंतराव देव-देवगिरीकर यांच्यावरही मात करिते झाले.

महर्षी शिंदे यांनी १९१९ च्या पूर्वी या पक्षाने ' बहुजनपक्ष ' व तोही वर्गीय आशयावर उभा असलेला चालवावा अशी योजना मांडली होती. ब्राह्मणेतर नाव बदलावे व ब्राह्मणांनाही प्रवेश असावा, मात्र अहिंदूंना नसावा, असे विचार या पक्षासाठी झटलेल्या मंडळीत निर्माण होऊ लागले व वैचारिक फूट पडू लागली (पृ. ९३).

मद्रासचा ब्राह्मणेतर पक्ष म. गांधींच्या प्रभावामुळे अगोदरच प्रथम काँग्रेसमध्ये गेला. हे पाहून तरुण पुढारी जेध्यांनी उत्तरोत्तर जास्ती जास्ती त्वरा केली (पृ. ९४). सायमन कमिशनशी सहकार्य करावे का न करावे, यासंबंधी ब्राह्मणेतरांत फूट पडली. शिंदे, जेधे, बागडे, कोठारी व भाऊराव पाटील बहिष्कार घालावा ह्या मताचे पुरस्कर्ते होते (पृ. १०८). जेधे व त्यांचा तरुण ब्राह्मणेतर पक्ष 'काँग्रेसमध्ये जाण्यास साहसाने तयारी करीत आहे, याची इत्थंभूत हकीगत फडके यांनी दिली आहे. विशेषतः जाधवरावसारखा व्यसनमुक्त माणूस दारू-मक्तेदारांचे आर्थिक साह्य घेऊन जवळकर व गणपतराव जाधव यांच्याकरवी "कैवारी" पत्र मुंबईस चालवितो व ब्राह्मणेतर पक्षात जाधवी (यादवी) निर्माण करितो. "कैवारी" पत्राचे धोरण गिरणीमालकधार्जिणे कसे होते, वगैरेसंबंधी त्यावेळची मजूर चळवळीची मुंबईतील हकीगत फडके देतात ( पृ. १३५ ). इंग्लंडनंतर रशिया वगैरे ठिकाणचा प्रवास करून आलेले जवळकर शेवटी काँग्रेसमध्ये प्रवेश करून जेधे यांच्याप्रमाणे सत्याग्रही स्वातंत्र्यसैनिक होतात. विशेषतः गाडगीळ यांच्या प्रयत्नाने जेधे व त्यांचा

आवडता ब्राह्मणेतर पक्ष गांधींची राष्ट्रीय चळवळ गिळून टाकते. मराठा-मराठेतर वादामुळेही नावारूपास आलेला ब्राह्मणेतर पक्ष संपला (पृ. १४०). दिल्ली कौन्सिलच्या निवडणुकीला जेधे, गाडगीळ काँग्रेसतर्फे उभे राहिले व त्यांना भास्करराव जाधव वगैरे ब्राह्मणेतरांनी देखील पाठिंबा दिला; पण या काळात जेध्यांच्यावर जास्ती परिणाम करणारे महर्षी शिंदे यांनीही जेधे यांच्या उमेदवारीला पाठिंबा दिला यात आश्चर्य नाही. शिंद्यांचे राष्ट्रीय राजकारण प्रथमपासूनचे होते.

जूट व फूट या पाचव्या प्रकरणात रशियात जाऊन डाव्या विचारसरणीचे बनलेले जवळकर यांच्यासंबंधी बरीच हकीगत फडके यांनी दिली आहे. ३ मे १९३२ रोजी जवळकर अकाली वारले व त्यांची जेधे यांच्याशी पुनः युती करण्याची इच्छा अपुरी राहिली. डॉ.आंबेडकरांच्या नासिकच्या काळाराम मंदिरप्रवेशात व महाडच्या चवदार तळ्याच्या सत्याग्रहात जवळकरांनी भाग घेतला होता. सार्वजनिक पाणवठे, ठिकाणे वगैरे हरिजनांस कायद्याने खुली असावीत असा ठराव ब्राह्मणेतर पक्षाचे बोले केशवराव यांनी १९२३ सालीच मुंबई कौन्सिलात मंजूर करून घेतला होता (पृ. ९६). बहुसंख्य ब्राह्मणेतर मतदार व ग्रामीण जनता अस्पृश्योद्धाराला अनुकूल नसल्याने मते जातील ह्या राजकीय सबबीवर सत्यशोधक ब्राह्मणेतर चळवळी अस्पृश्यांच्या प्रश्नापासून अलगच राहिल्या. ब्राह्मणेतर पक्ष म्हणजे दलितांच्या पुढाऱ्यांना घेऊन धरून चालविलेला पक्ष किंवा व्यापक चळवळ असा कधीच अर्थ व व्यवहार नव्हता.

माटे-केळकर व तत्सम टिळकानुयायी पुढारी अस्पृश्योद्धाराला अनुकूल होते, तरी सत्याग्रह करून मंदिरप्रवेश करणे त्यांना नामंजूर होते. डॉ. आंबेडकरांनीही महाड सत्याग्रह मागे घेतला (पृ. ९९). सत्याग्रह करून जेधे-जवळकर तुरुंगात जाण्याच्या तयारीने महाडला गेले होते. सत्याग्रही लढ्यात ब्राह्मण कोणी घेऊ नये असे जेधे-जवळकरांचे मत होते. आंबेडकर ब्राह्मण व ब्राह्मण्य विभक्त समजत व ते ब्राह्मणेतरांतही असू शकते असे आंबेडकरांनी जाहीरपणे सांगितले (पृ. ९७). फडक्यांनी अशा अनेक नाजूक बाबी स्पष्टपणे दर्शविल्या आहेत. हे सर्व करणे व सांगणे सोपे नाही. फडक्यांनी केवळ आधारार्थ साधनेच भरपूर वापरली आहेत असे नव्हे, तर अभ्यासांती त्यांची योग्य ठिकाणी योजना केलेली सर्वत्र आढळते. उदा., पृ. सातवरील शाहू महाराजांचा कल आर्यसमाजाकडे होता हे फडक्यांचे प्रतिपादन मान्य करूनही असे म्हणता येते, की शाहूमहाराजांमुळेच राजकीय ब्राह्मणेतर पक्ष साकार झाला, सत्यशोधक चळवळीसाठी त्यांनी आर्यसमाजापेक्षा जास्ती धन खर्ची घातले.

जेधे-गाडगीळ यांच्या निवडणुकीला डॉ. आंबेडकर यांनी व केळकर-केसरी यांनी पाठिंबा दिला नाही. काँग्रेसने काढलेल्या लँड लीगला कर्मवीर शिंदे व जेधे यांनी पाठिंबा दिला (पृ. ११४). भास्करराव जाधव व आंबेडकर काँग्रेसपासून शेवटपर्यंत अलग राहिले. एकपरी कौन्सिलातील मर्यादित हक्क व सायमन कमिशन देऊ पाहणारे स्वराज्य यासंबंधाने तरुण मराठा-मराठेतर पुढाऱ्यांत अनुभवाने असमाधानच निर्माण झाले व या सर्वांनी स्वातंत्र्यसैनिक कर्मवीर शिंदे व जेधे यांना अनुसरून फार मोठ्या प्रमाणात उत्तरोत्तर काँग्रेसचा कबजा घेतला. हे राष्ट्रीय राजकारण पुढे यशवंतरावांनी वाढविले. इंग्रजनिष्ठ शाहूमहाराजांच्या ब्राह्मणेतर पक्षाला स्वराज्यद्रोही म्हणणारा केळकर-भोपटकर व केसरी ब्राह्मणेतर चळवळ काँग्रेसमध्ये आल्यानंतर काँग्रेसपासून दूर झाला. ही देखील महत्त्वाची फूट ठरते.

फडक्यांचे 'जूट व फूट' हे प्रकरण महाराष्ट्राचा सामाजिक स्वभाव व ठेवण आणि महाराष्ट्रीय पुढाऱ्यांचा स्वभाव दर्शविते. जेधे अंतर्गत ब्राह्मणेतर पक्षीय स्वकीयांच्या अन्यायी धोरणाच्या विरुद्ध लढले. त्याचप्रमाणे अन्यायाविरुद्ध वेगळी लढत त्यांना काँग्रेसमध्ये गेल्यावरही करावी लागली. जेधे यांचे जीवन संघर्षमय होते व त्यांनी शूराचे समाजकारणही भरपूर केले.

जेधे यांची साधी राहणी व वाचनाची आवड (पृ ८० व २६२) प्रस्तुत लेखकानेदेखील पाहिली आहे. केशवरावांचा प्रामाणिकपणा व करारीपणा काँग्रेसमध्ये गेल्यावर तेथे लोकांच्या ध्यानी येण्यास वेळ लागला. गाडगीळ व जेधे वरचेवर तुरुंगात एकत्र आल्याने मैत्री दृढ झाली (पृ. १४६). फडक्यांनी

अनुक्रमणिका






जेध्यांच्या स्वभावावर मधून मधून प्रकाश टाकला आहे. जेध्यांचे स्वातंत्र्यपूर्व चरित्र व स्वातंत्र्यानंतरचे कार्य यांचे दर्शन हे पुस्तक देते. जेधे यांच्या समकालीन इतिहासाच्या पार्श्वभूमीवर फडकेकृत जेधेचरित्र अधिष्ठित आहे.

जातीय निवाड्याच्या संदर्भात १९३२ साली गांधींनी प्राणांतिक उपवास केला. या वेळी कर्मवीर शिंदे व जेधे यांनी राखीव जागांच्या तत्त्वाला पाठिंबा दिला व डॉ. आंबेडकरांनी विवेकांती तडजोड केली व पुणे करार झाला (पृ. १४७). हा सर्व काळ सर्वांगीण जागृतीचा होता. जेधे यांची भाषणे व कर्मवीर शिंदे यांचीही अनेक भाषणे फडक्यांनी प्रथमच उपलब्ध केली आहेत.

केशवरावांसंबंधी गुरुवर्य शिंदे १९३४/३५ सालात माझ्याजवळ म्हणाले होते की– 'Jedhe is not a Scholar' या शिंद्यांच्या अनुभवी वाक्याचा परिचय गाडगीळ यांच्याबरोबर दिल्ली असेंब्लीत गेल्यावर इंग्रजीच्या उत्कृष्ट ज्ञानाच्या अभावी जेधे यांना स्तब्ध दिवस काढावे लागले याचे जे वर्णन फडक्यांनी दिले आहे, त्यावरून येतो (पृ. १५५). संयुक्त महाराष्ट्राची चळवळ व गोवामुक्ती ह्यांवर मराठीत अनेक पुस्तके झाली आहेत. पण उपेक्षित सत्यशोधक ब्राह्मणेतर चळवळीचा पुष्कळसा संगतवार इतिहास फडक्यांनी प्रथमच साकार केला आहे. नेहमीच्या रिवाजाप्रमाणे या पुस्तकाला दुसऱ्या कोणाही मान्यवर व्यक्तीची प्रस्तावना मुळीच नाही.

जेधे काँग्रेसमध्ये गेल्यावर प्रांताध्यक्ष झाले. सहाव्या प्रकरणात जेध्यांनी जे काँग्रेसमध्ये अनुभविले त्याचा म्हणजे १९४५ पर्यंतचा इतिहास आहे. ना. खेर वगैरेंच्या राजकारणाचा कटू अनुभव आल्यामुळे शेतकरी कामगार पक्षाची स्थापना करणे भाग होते. आणखी मोरारजी व जेधे यांचा खटका उडतो (पृ. १९०). ३० जानेवारी १९४८ साली महाराष्ट्रात झालेल्या जाळपोळीची मीमांसा श्री. फडके यांनी दिली आहे. कर्मवीर भाऊराव पाटील व खेर यांच्यातील बेबनावाचे चित्रही पुढे फडक्यांनी निःपक्षपाताने रंगविले आहे. पुस्तकात इतिहासभूत झालेल्या अनेक विवाद्य ठरलेल्या घटना आहेत. फडक्यांचे सर्वांवरील विवेचन मनोवेधक आहे. काँग्रेस सोडून शे. का. पक्ष एक ऐतिहासिक गरज म्हणून काढल्यावर जेधे यांना मोरे यांचा जो विचित्र अनुभव आला, त्यामुळे जेधे पुनः काँग्रेसमध्ये येतात. आठवे प्रकरण शे. का. पक्षाचा इतिहासच होय. दाभाडी प्रबंधाने शे. का. प. ने दीर्घ चर्चेनंतर मार्क्सवादी दृष्टिकोण स्वीकारला. जुन्या ब्राह्मणेतर सत्यशोधक पक्षाला असे डावे तत्त्वज्ञान नव्हते. जेधे –मोरे हे दोघे संस्थापक शे. का. प. सोडून काँग्रेसवासी झाले तरी अद्याप महाराष्ट्रात शे. का. प. हयात आहे. नवव्या प्रकरणात गोवामुक्ती आंदोलन व संयुक्त महाराष्ट्र चळवळ हे मोठे प्रकरण फडक्यांनी निवेदिले आहे. द्विभाषिकवाल्यांबरोबर जेधे यांनी मोठी झुंज दिली व संयुक्तमहाराष्ट्र मुंबईसह झाला, याचा सार्वजनिक इतिहास फडक्यांनी मांडला आहे. यशवंतरावांशीदेखील जेधे यांना ( व नाना पाटील यांनाही ) लढावे लागले. पण जेध्यांची जुनी सत्यशोधक चळवळ व वरील सर्व कार्य यशवंतरावांना तीस वर्षे महाराष्ट्रावर बहुजनसमाज संघटित करून पक्कड राखण्यास पायाभूत ठरली. हा काळ देखील आता संपला ! सर्वच महाराष्ट्राला दुहीचा व अंतर्गत पुढाऱ्यांमधील यादवीचा शाप असतो. फडक्यांचे चित्तवेधक पुस्तक याची सर्वत्र साक्ष देते. जेधे यांची मते, काही भाषणे व मतभेद हे सारे प्रथमच सोपपत्तिकरीत्या वाचावयास मिळते. दहावे प्रकरण ज्यांनी सर्व आयुष्य सार्वजनिक कार्यास वाहिले, त्या केशवरावांचे अखेरचे दिवस वर्णिते. फडक्यांनी जेध्यांची योग्यताही विशेषाने पटवून हा 'जेधे ग्रंथ' पूर्ण केला आहे. जेधे यांचे चरित्र साकार करण्यासाठी फडक्यांनी जी साधने वापरली व शेवटी जेधे यांच्या चरित्रकार्याशी कितीतरी पुढारी व्यक्ती, संस्था, चळवळी, घटना व प्रसंग यांचा संबंध दाखविणारी प्रदीर्घ सूची जोडली आहे. यावरून जेधे यांची स्वतंत्र योग्यता समजते. फडक्यांच्या ह्या परिश्रमी प्रयत्नामुळे महाराष्ट्रातील नवी पिढी त्यांची ऋणीच राहील. निकोप असा हा 'जेधे ग्रंथ' उपलब्ध केल्याबद्दल श्री. य. दि. फडके यांना धन्यवाद देणे, हे एक सामाजिक कर्तव्य ठरते.

– रा. ना. चव्हाण

अनुक्रमणिका








## अणुयुद्धाचे परिणाम

अण्वस्त्रांमागचे 'तत्वज्ञान' काय असेल? युद्धाचा उद्देश शत्रूच्या सैन्याचा बीमोड करून त्याच्या प्रदेशावर काबू मिळविण्याचा असतो. तेव्हा आपण ज्यांच्या दृष्टीने शत्रूच्या स्थानी आहो अशा देशांना असे करता येणार नाही, निदान जबरदस्त किंमत दिल्याशिवाय करता येणार नाही एवढी आत्मसंरक्षणाची सिद्धता प्रत्येक देशाला बाळगावी लागते. शस्त्रास्त्रांच्या बाबतीत आणि एकंदरीत युद्धसामर्थ्याच्या बाबतीत सर्वसाधारणपणे शत्रूच्या निदान बरोबरीने आपण असणे आवश्यक आहे असेच सर्व देश मानतात, व्यवहारात हे साधणे नेहमी शक्य असते असे नाही. तंत्रज्ञान, औद्योगिक सामर्थ्य, लोकसंख्या यांच्यावर असलेल्या मर्यादांमुळे प्रत्येक देशाच्या युद्धसामर्थ्यावर अपरिहार्यपणे मर्यादा पडतात. या अडचणीवरील एक रूढ उपाय म्हणजे ज्यांचे हितसंबंध समान असतील अशा मर्यादित लष्करी सामर्थ्याच्या देशांनी एकत्र येऊन संभाव्य बलाढ्य शत्रूशी बरोबरी साधण्याचा प्रयत्न करणे. अर्थात बलाढ्य देश अशी आपल्याविरुद्ध एकी होऊ नये आणि झाली तरी एकवटलेल्या शक्तीला पुरून उरेल एवढे आपले सामर्थ्य असावे अशी खटपट करील. उदा., युरोपच्या भूखंडातील कोणत्याही दोन देशांच्या एकवटलेल्या नाविक सामर्थ्यापेक्षा आपल्या एकट्याचे नाविक सामर्थ्य अधिक राखणे हे पारंपरिक ब्रिटिश रणनीतीचे एक प्रमुख सूत्र होते.

अण्वस्त्रांमुळे पारंपरिक लष्करी रणनीती आणि लष्करी राजकारण यांतील बऱ्याच कल्पना गैरलागू ठरत आहेत. अण्वस्त्रे ही अतिशय खर्चिक आहेत. केवळ अणुबाँब, अणुस्फोटक ( वॉरहेड ) बनवून भागत नाही; ह्या अस्त्रांचा त्यांच्या लक्ष्यांवर मारा करण्यासाठी प्रेषणव्यवस्था ( डिलिव्हरी सिस्टिम ) संघटित करावी लागते. बाँबवाहक विमाने, पाणबुड्या, क्षेपणास्त्रे ह्यांची मिळून ही प्रेषणव्यवस्था बनलेली असते. शत्रूकडून कधीही अणुहल्ला होईल ही शक्यता ध्यानात घेऊन शत्रूच्या हालचाली, त्याची बदलती व्यूहरचना यांची सतत टेहळणी करावी लागते. हल्ला अचानक आला तर त्याची माहिती निर्णयकेंद्राला तावडतोब मिळावी आणि योग्य तो प्रतिसाद देता यावा यासाठी, आणि याबरोबरच, खालच्या पातळीवरील कुणाही अधिकाऱ्याने चुकून किंवा निर्णय स्वतःच्या हाती घेऊन, अणुहल्ला करू नये यासाठी कार्यक्षम अशी आदेश–नियंत्रण व्यवस्था ( कमांड अँड कन्ट्रोल ) रचावी लागते. ही शेवटची बाब अतिशय महत्त्वाची आहे. कुणाच्याही हातून चुकीने किंवा बेजबाबदारपणे घेतलेल्या निर्णयामुळे अणुयुद्ध सुरू होणार नाही अशी खबरदारी घेणे अतिशय आवश्यक आहे व म्हणून प्रत्येक पातळीवर वरच्या पातळीचे कडक नियंत्रण असेल अशी व्यवस्था करावी लागते. पण ह्याबरोबरच जेव्हा अणुहल्ला सुरू करायचा असेल तेव्हा हुकमाची किमान वेळेत अमलबजावणी होईल अशीही व्यवस्था असावी लागते. लहान तर सोडाच पण मध्यम प्रतीच्याही विकसित राष्ट्रांना या सर्व यंत्रणा उभारून चालू राखणे परवडण्यासारखे नाही. यामुळे जगाच्या रंगभूमीवर महासत्तांचा उदय झाला आहे. इतर देशांना जर आपल्या उद्दिष्टांसाठी युद्ध खेळायचे असेल– उदा. इंग्लंड–अर्जेन्टिना, इराण–इराक, भारत–पाकिस्तान, इ.– तर ते रूढ ( कन्व्हेन्शनल ) शस्त्रास्त्रांनी 'मर्यादित' युद्ध खेळू शकतात. पण अमेरिका आणि रशिया ह्या महासत्ता या युद्धांत ओढल्या जाणार नाहीत, त्यांचा कल कुणाच्याही बाजूला असला तरी त्या तटस्थ राहतील अशी हमी असली तरच अशी युद्धे होऊ शकतात. अशी हमी काही प्रमाणात मिळू शकते आणि म्हणून महासत्ता धरून सर्व देशांना रूढ शस्त्रास्त्रांच्या बाबतीत सुसज्ज असावे लागते. पण अशा युद्धात एका बाजूने एक महासत्ता ओढली जाण्याचा आणि त्याचा परिणाम म्हणून दुसऱ्या बाजूने दुसरी महासत्ता गोवली जाण्याचा धोका नेहमी कायम असतो. महासत्ता जर लहान देशांच्या वतीने एकमेकांशी युद्ध खेळू लागल्या तर सुरवातीला त्या रूढ शस्त्रांचाच वापर करतील यात शंका नाही. पण कठीण परिस्थिती निर्माण झाली तर अण्वस्त्रांचा वापर करण्याचा जबरदस्त मोह एखाद्या पक्षाला होणे शक्य आहे. तेव्हा आज एखाद्या देशाने रूढ शस्त्रास्त्रांच्या साहाय्याने फक्त मर्यादित युद्ध



अनुक्रमणिका






खेळण्याचे ठरविले तरी त्यातून अणुयुद्धाचा भडका उडण्याची शक्यता अशा युद्धाच्या पोटात असते हे भान त्या युयुत्सू देशाने आणि इतरांनीही ठेवणे अत्यावश्यक आहे.

रूढ शस्त्रास्त्रांचा– बाँब, बाँबवाहक विमाने, तोफा, इ.–पल्ला आणि शक्ती यांच्यांत आज एवढी वाढ झाली आहे की अण्वस्त्रांचा वापर न करताही जर एखादे मोठे युद्ध भविष्यात लढले गेले तर ते अतिशय विनाशक ठरेल. ( पहिल्या महा-युद्धात सुमारे १ कोट एवढी आणि दुसऱ्या महा-युद्धात सुमारे ३॥–६ कोट एवढी मनुष्यहानी झाली. ) आणि तरीही रूढ शस्त्रास्त्रे आणि अण्वस्त्रे यांच्यामध्ये गुणात्मक फरक आहे. रूढ शस्त्रास्त्रांच्या वापराने जीविताची आणि संपत्तीची खूप हानी होईल पण देश पालथा पडणार नाही. पण एखाद्या देशाविरुद्ध जर अण्वस्त्रे वापरण्यात आली तर तो बेचिराख होईल आणि काही काळ त्याचा परिसर माणसांनी राहण्याजोगा उरणार नाही, ही गोष्ट सर्वांना माहीत आहे. म्हणून अण्व-स्त्रांचा खरा उपयोग युद्ध जिंकण्यासाठी नसून प्रति-पक्षाने युद्धात उतरूच नये अशी दहशत अण्वस्त्रांच्या वापराच्या धमकीमुळे त्याला बसते हा आहे. आता दोन महासत्तांकडे प्रेषणव्यवस्थेसकट अण्वस्त्रे आहेत. ह्या परिस्थितीत या दहशतीचे स्वरूप काय असेल ? दुसरी महासत्ता कधीही आपल्याविरुद्ध अण्वस्त्रांचा वापर करण्याची शक्यता आहे हे प्रत्येकीला माहीत आहे. तेव्हा "तुम्ही जर आमच्या-विरुद्ध अण्वस्त्रांचा हल्ला केला तर आम्ही असा जबरदस्त प्रतिटोला देऊ, की तुमची असह्य हानी होईल, तेव्हा तुम्ही प्रथम हल्ला करण्याच्या फंदात न पडणे बरे" असे दुसऱ्या पक्षाला सांगता आले पाहिजे. तेव्हा ही धमकी परिणामकारक ठरेल. आपण अचानक अणुहल्ला केला तर आपल्यावर होणाऱ्या प्रतिआघातामुळे आपली कल्पनातीत हानी होईल हे दुसऱ्या पक्षाला स्पष्टपणे दिसून येईल एवढे आण्विक सामर्थ्य प्रत्येक पक्षाकडे असले पाहिजे. तरच दुसऱ्या पक्षाकडेही आण्विक सामर्थ्य असताना त्याला दशहत देण्याचे सामर्थ्य प्रत्येक पक्षाकडे असेल. ह्या विचारातून आण्विक शस्त्रास्त्र-स्पर्धा सुरू होते. दुसऱ्या पक्षाचे आण्विक बळ जितके वाढेल तितका त्याचा पहिला हल्ला अधिक विना-शक ठरेल. तेव्हा त्यातून तग धरून, त्याच्यामुळे आपल्या सामर्थ्याला जी भगदाडे पडली असतील ती जमेला धरूनसुद्धा दुसऱ्या पक्षावर जबरदस्त आघात करण्याएवढे सामर्थ्य आपल्याकडे असले पाहिजे असा हिशोब प्रत्येक पक्ष करतो. शिवाय ह्यातून एक वेगळा विचार सुरू होतो. एवढा नाश–शत्रूचा आणि आपला–जर आपण पाहायला तयार झालोच आहोत, तर मग आपल्या सिद्धतेत आणखी भर घालून अणु-युद्ध जिंकता येईल एवढे सामर्थ्य का कमावू नये ? ह्यासाठी तिसऱ्या हल्ल्याचा विचार करावा लागतो. आपण शत्रूवर केलेला पहिला हल्ला, शत्रूचा आपल्यावरील प्रतिहल्ला आणि युद्ध जिंकून देणारा आपला शत्रूवरील प्रति-प्रतिहल्ला. अर्थात आपल्या पहिल्या हल्ल्यामुळेच शत्रू कोसळला आणि आपण युद्ध जिंकले असे झाले तर फारच चांगले.

या आण्विक शस्त्रास्त्रस्पर्धेतून आज जगात निदान १८००० अणुस्फोटक निर्माण झाले आहेत आणि त्यांची विनाशक शक्ती १०,००० मेगॅटन ( दहा अब्ज टन ) एवढी आहे. आजची मानवजातीची स्थिती म्हणजे जागृत ज्वालामुखी-पर्वताच्या शिखरा-भोवती एखादा बसलेला असावा आणि आपले नेह-मीचे व्यवहार पार पाडण्यात मग्न असावा तशी आहे, असे अनेकदा म्हटले जाते. पण ज्वालामुखीचा उद्रेक स्थानिक असतो; अणुस्फोटकांचे परिणाम सबंध पृथ्वीला व्यापणारे होतील.

ह्या परिणामांचे स्वरूप आणि व्याप्ती काय असेल याचा तपशीलवार आणि वैज्ञानिक अंदाज घेण्याचा अलीकडे झालेला एक उल्लेखनीय प्रयत्न प्रा. कार्ल सागन यांनी केला आहे. हे कोर्नेल विद्यापीठात ज्योतिषशास्त्र आणि अवकाश-विज्ञान यांचे प्राध्यापक आहेत व त्या विद्यापीठाच्या ग्रहगोल-संशोधन-प्रयोगशाळेचे संचालक आहेत. त्यांच्या नेतृत्वाखाली झालेल्या या अभ्यासात २४ अमेरिकन वैज्ञानिक सहभागी होते आणि तो प्रसिद्ध झाल्यानंतर त्याची चिकित्सा करण्यासाठी भरलेल्या वैज्ञानिकांच्या परि-षदेत त्याच्या निष्कर्षांना दुजोरा मिळाला आहे. रशियन वैज्ञानिकांनी ह्याच स्वरूपाचा जो अभ्यास स्वतंत्रपणे केला आहे, त्याचे निष्कर्षही सागन यांच्या निष्कर्षाशी जुळणारे आहेत.

हा निष्कर्ष थोडक्यात असा : एखाद्या अणुसत्तेने आपण अचानक दुसऱ्या देशावर व्यापक अणुहल्ला करून त्याला पुरते लोळवू आणि अणुयुद्ध पहिल्याच सपाट्यात जिंकू अशी आशा बाळगणे व्यर्थ आहे. कारण दुसऱ्या देशाने काहीही प्रतिकार केला नाही तरी या हल्ल्याचे परिणाम असे असतील, की त्यांच्यामुळे हल्ला करणाऱ्या देशातील जीवनही उद्ध्वस्त होईल. अनेक देशांना आपण महासत्तांच्या संघर्षापासून अलिप्त राहिलो आणि विशेषतः आपल्या भूमीवर अण्वस्त्रे ठेवली नाहीत, तर अणुयुद्धापासून आपण स्वतःला वाचवू शकू, अशी आशा वाटते. हासुद्धा एक भ्रम आहे. कारण अणुहल्ल्याचे परिणाम जगड्व्याळ असतील. कोणताच देश त्यांपासून निसटू शकणार नाही.

शंभर मेगॅटन एवढ्या सामर्थ्याची अणुस्फोटके वापरून जर अणुहल्ला केला तर त्याचे मानवी जीवनावर आणि परिसरावर काय परिणाम होतील याचे गणित सागन यांनी केले आहे. (प्रत्यक्षात १८,००० मेगॅटन एवढ्या शक्तीचे अणुस्फोटक आज उपलब्ध आहेत हे आपण वर पाहिलेच आहे.) अणुहल्ल्याचे एकंदर परिणाम काय होतील याविषयी आतापर्यंत जो विचार करण्यात येत असे, त्यात प्रामुख्याने स्फोटाचा दणका, स्फोटामुळे निर्माण होणारी उष्णता आणि किरणोत्सर्गी सामग्री ह्यांच्याकडे ध्यान देण्यात येत असे. पण अणुस्फोटाचे इतरही काही उपपरिणाम होतील. उदा., मानवी वसती, अरण्ये इ. जळल्यामुळे निर्माण होणारी राख. अणुहल्ल्यातील स्फोटांमुळे निर्माण होणाऱ्या सर्व प्रकारच्या परिणामांची दखल घेऊन त्यांचे एक तपशीलवार आणि सर्वांगीण चित्र आपल्यापुढे ठेवण्याचा सागन यांचा प्रयत्न आहे.

एक परिणाम असा होईल, की जवळ जवळ सर्व जगभर सत्तर दिवसांपेक्षा अधिक काळ आणिक गारठा पसरेल. तपमान शून्याखाली २० अंश इतके खाली आलेले असेल. मात्र स्फोटानंतर ताबडतोब प्रचंड तपमान निर्माण होईल. पण त्यामुळे वातावरणात नायट्रोजन ऑक्साइड्स निर्माण होतील, त्यांच्यामुळेच वातावरणातील ओझोनचा थर नष्ट होईल. सूर्यकिरणांद्वारा जे अतिरेकी अल्ट्राव्हायलेट किरणोत्सर्जन होते त्यापासून पृथ्वीच्या पृष्ठभागाचा बचाव करण्याचे कार्य हा थर करीत असतो. तो नष्ट झाल्यामुळे पृथ्वीच्या पृष्ठभागावरील किरणोत्सर्जन वाढेल आणि त्याचे विपरित परिणाम होतील. पण स्फोटामुळे जो धुरळा उडेल आणि आगी लागल्यामुळे जी राख निर्माण होईल त्यांचे वातावरणातील प्रमाण एवढे असेल, की त्यांच्यामुळे सूर्यकिरणांना अटकाव होईल. पृथ्वीवर जो गारठा पसरेल तो ह्या राख-धुळीच्या थरामुळे. अर्थात पृथ्वीवर अंधारही होईल.

आता वनस्पतींनी आपली जीवनक्रिया जर व्यवस्थितपणे पार पाडायची असेल तर सूर्यप्रकाशाची एक किमान पातळी वातावरणात असावी लागते. राखधुळीच्या ढगांनी पृथ्वीवर जर अंधार टिकून राहिला तर त्याचा अर्थ असा, की ही पातळी राखली जाणार नाही. म्हणजे वनस्पतिजीवन आणि शेती धोक्यात येईल.

स्फोटामुळे निर्माण झालेली प्रचंड उष्णता, अचानक वाढलेले किरणोत्सर्जन, ओझोन थराचे विघटन, सूर्यकिरणांना झालेला मज्जाव या एकेका घटकामुळे जे परिणाम घडतील त्यांचे वर्णन आतापर्यंत आपण केले. पण ह्या घटकांमुळे संयुक्तपणे जे परिणाम घडतील, त्यांचा अंदाज घेणेही कठीण आहे.

एक शक्यता अशी आहे. माणसांना ताबडतोब मारक ठरणाऱ्या किरणोत्सर्गाच्या पातळीखाली किरणोत्सर्जन होत राहिल्यामुळे माणसे वाचतील. पण नेहमीपेक्षा वाढलेले हे किरणोत्सर्जन आणि अल्ट्राव्हायलेट किरणोत्सर्जन यांच्यामुळे रोगराई पसरेल. उदा., सूक्ष्मजंतूंचे नवीन प्रकार अस्तित्वात येतील आणि त्यांतील काही रोग-जनक (पॅथोजिनीक) असतील. शिवाय पक्षी हे माणसापेक्षा किरणोत्सर्गाची अधिक पातळी सहन करू शकतात. त्यांच्या भ्रमणामुळे ह्या रोगजंतूंच्या जाती पृथ्वीवर सर्वत्र पसरतील आणि जगभर महासाथी फैलावतील.

हल्ल्यानंतर स्फोटाचा जो दणका बसेल त्याचे परिणाम किंवा जी प्रचंड उष्णता आणि मारक किरणोत्सर्जन निर्माण होईल त्यांचे परिणाम फारतर एक दिवसभर टिकतील. पण त्यामुळे लागलेल्या आगी महिनाभर जळत, धुमसत राहतील आणि विषारी वायू अनेक महिने वातावरणात राहतील. राख-धुळीच्या ढगांमुळे निर्माण झालेला गारठा





आणि अंधार वर्षभर राहील. पाणीपुरवठा गोठून राहील. अन्नाची भयानक टंचाई असेल आणि जगभर पसरलेल्या महासाथींची आपत्ती आली असताना आरोग्यसेवा उपलब्ध असणार नाहीत.

हे सर्व परिणाम केवळ १०० मेगॅटन स्फोटकांमुळे घडून येतील ही गोष्ट ध्यानात घेतली पाहिजे. ह्याच्या १०० पट आण्विक स्फोटक सामग्री आज वापरासाठी उपलब्ध आहे. अणुयुद्धाच्या सुरवातीला आदेश–नियंत्रणव्यवस्था कार्यक्षम असली आणि ठरविण्यात आलेल्या लक्ष्यांवरच ठरविण्यात आलेल्या स्फोटक सामग्रीचा मारा होत राहिला, तरी असे एकदोन हल्ले-प्रतिहल्ले झाल्यावर ही व्यवस्था विघटित होईल आणि ठिकठिकाणांहून हजारो स्फोटके एकमेकांवर मारण्यात येतील अशीच अणुयुद्धाच्या नियोजकांना भीती वाटते. तेव्हा अणुयुद्ध सुरू झाल्यानंतर वापरण्यात आलेली स्फोटके १०० मेगॅटनांपुरती मर्यादित राहतील, असे मानता येणार नाही.

आज अणुयुद्धाचा विचार जेव्हा आपण करतो, तेव्हा अमेरिका आणि रशिया या महासत्ताच आपल्या डोळ्यांपुढे असतात. पण वर वर्णन केलेले जगड्व्याळ परिणाम केवळ १०० मेगॅटन स्फोटकांनी घडून येतील असे आहेत आणि नजीकच्या भविष्यात इंग्लंड आणि फ्रान्स ह्या राज्यांकडे, आणखी काही वर्षांनी चीनकडे एवढी स्फोटक सामग्री वापरासाठी सज्ज असेल. जर तुमच्याकडे १०० मेगॅटन एवढ्या एकंदर ताकदीचे १००० स्फोटक असले तर सबंध जगाला दहशत घालण्याचे सामर्थ्य तुमच्या ठिकाणी असेल. आणखी सामर्थ्य कमविण्याचे तुम्हाला कारण उरणार नाही. ती व्यर्थ वाढ ठरेल. उदा., रशियन एस्. एस्. २० ही क्षेपणास्त्रे किंवा अमेरिक पर्शिंग–२ ही क्षेपणास्त्रे यांच्यामुळे विरुद्ध पक्षाला असलेला धोका वाढला आहे असे अनेकजण मानतात. परंतु विरुद्ध पक्षाचा (आणि स्वतःचाही) सर्वनाश करण्याची ताकद अगोदरच दोन्ही पक्षांकडे असल्यामुळे आणि सर्वनाशापेक्षा अधिक मोठा धोका असणे अशक्य असल्यामुळे ही समजूत भ्रामक ठरते.

दुसरी एक समजूत अशी आहे, की दोन्ही महासत्तांच्या संमतीने जर अणु-मुक्त असे काही प्रदेश पृथ्वीवर राखता आले तर त्यांतील राष्ट्रे अणुयुद्धाच्या धोक्यापासून स्वतःला वाचवू शकतील. समजा, उत्तर गोलार्धात युरोप–अमेरिकेच्या अक्षांक्षांच्या प्रदेशात अणुयुद्ध झाले, तर आशिया-आफ्रिकेच्या विकसनशील देशांवर त्याचे काय परिणाम होतील? एक तर युरोप–अमेरिकेची अर्थव्यवस्था कोलमडल्यामुळे एक जबरदस्त आर्थिक फटका या देशांना बसेल. युरोप–अमेरिकेकडून उपलब्ध होणारी यंत्रसामग्री, तांत्रिक सेवा, अन्नधान्याची मदत इ. गोष्टींना आचवावे लागेल; पण हे देश सर्वनाशापासून बचावतील. पण हीसुद्धा एक भ्रामक समजूत ठरली आहे. युरोप–अमेरिकेत झालेल्या अणुयुद्धामुळे ह्या देशांतील लोकसंख्या इतिहासपूर्वकाळी होती तितकी खाली येईल आणि तिला रानटी अवस्थेमध्ये जगावे लागेल. भारत, ब्राझील, नायजीरिया, सौदी अरेबिया हे देश, त्यांच्या प्रदेशांवर एकही बाँब पडला नाही तरी, कोसळून पडतील. तेव्हा आण्विक महासत्तांच्या आणि त्यांच्या अनुयायांच्या प्रदेशांपासून दूर असलेले देशही जर टिकून राहायचे असतील, तर ह्या महासत्तांनी शहाणपणा दाखवावा आणि अणुयुद्ध करू नये अशी खटपट त्यांनी केली पाहिजे. पण प्रार्थना करण्यापलीकडे अधिक काही त्यांच्या हातांत आहे, असे दिसत नाही.

सोव्हिएट वैज्ञानिकांनी स्वतंत्रपणे जो अभ्यास केला त्याच्यात त्यांना असे आढळून आले, की युद्धानंतर सुमारे चाळीस दिवस झाल्यावर जगभर तपमानाची पातळी १५ ते ४० सेंटिग्रेड अंशांनी कमी झालेली असेल आणि ह्याचे परिणाम कास्पिअन समुद्रापासून श्रीलंकेपर्यंत आणि चाडपासून तोव्होसिबिस्कपर्यंत घडून आलेले असतील. ह्या प्रदेशात भारत, पाकिस्तान आणि पश्चिम चीन यांचा समावेश आहे. पण इराण, अफगाणिस्तान आणि सौदी अरेबिया या देशांना सर्वांत मोठा फटका बसेल.

हिंदू पुराणात प्रलयकालाची जी वर्णने आढळून येतात त्यांच्यासारखे हे चित्र सागन ह्यांनी काटेकोर वैज्ञानिक पद्धतीचा वापर करून उभे केले आहे. त्याच्यात कल्पनेच्या भरार्‍यांना स्थान नाही. भौतिकी, रसायनशास्त्र, जीवशास्त्र यांच्यांत सिद्ध झालेल्या सिद्धांतांना अनुसरून गणिती पद्धतीने

त्याना हे निष्कर्ष काढले आहेत. पण ते एवढे भीषण आहेत, की त्यांचे वर्णन एखाद्या दुःस्वप्नासारखे वाटते. म्हणजे हे सर्व काल्पनिक आहे, प्रत्यक्षात असे घडून येणे अशक्य आहे असे मानण्याकडे सर्वांचा कल होतो. पण हाही एक भ्रम आहे. आज अब्जावधी डॉलर्स खर्च करून अण्वस्त्रांची स्पर्धा चालू ठेवण्यात दोन्ही महासत्ता गुंतलेल्या आहेत. कोणत्यातरी, अत्यंत असाधारण अशा का होईना, पण जी उद्‌भवणे शक्य आहे अशा परिस्थितीत ती वापरावी लागतील अशी सत्ताधाऱ्यांची धारणा असल्याशिवाय ही स्पर्धा चालू राहिलीच नसती. शिवाय केवळ अशा अत्यंत असाधारण परिस्थितीतच अण्वस्त्रांचा वापर होईल अशी खात्री बाळगता येत नाही. कारण आदेश-नियंत्रणव्यवस्था कितीही भक्कम केली तर चुकीने किंवा एखादा माणूस गांगरल्याने, अणुयुद्धाची ठिणगी कधी पडेल आणि भडका कधी उडेल, हे सांगता येणार नाही.

⊙ ⊙ ⊙

## साभार पोच

* **व्यथाफुली** ( कवितासंग्रह ) – सुखदेव ढाणके; अभिनव प्रकाशन, दादर, मुंबई ४०००१४; १९८३; पृ. ४६; किं. ५ रु.
* **मराठी कादंबरी : चिंतन आणि समीक्षा** – डॉ. चंद्रकांत बांदिवडेकर; मेहता पब्लिशिंग हाऊस, घनश्री अपार्टमेंट्स, पुणे– ३०; १९८३; पृ. २२७; किंमत ४० रुपये.
* **व्यवहारात विज्ञान पहा** – डॉ. गो. रा. केळकर; अनिरुद्ध साहित्य, १४९३ क, सदाशिव पेठ, पुणे– ३०; १९८१; पृ. ११६; किं. ११ रुपये.
* **गावकी** ( आत्मकथन ) – रुस्तुम अचलखांब; श्रीविद्या प्रकाशन, २५० शनिवार, पुणे ३०; १९८३; पृ. ७९; किं. २० रु.
* **उसासा** ( काव्यसंग्रह ) – दत्ता वाघ; चेतश्री प्रकाशन, देशमुख चाळ, अमळनेर; १९८३; पृ. ३२; किं. ७ रुपये.
* **तडजोड** ( कवितासंग्रह )– नीता शाह; चेतश्री प्रकाशन, देशमुख चाळ, अमळनेर; १९८३; पृ. ७०; किं. १२ रुपये.
* **वेळूबनातली शीळ** ( कवितासंग्रह )– अनुराधा साळवेकर; चेतश्री प्रकाशन, देशमुख चाळ, अमळनेर; १९८३; पृ. ७९; किं. १५ रुपये.
* **मिटलेली कवाडे**– मुक्ता सर्वगोड; चेतश्री प्रकाशन, देशमुख चाळ, अमळनेर; १९८३; पृ. १६१; किं. २० रुपये.
* **रानभैरी** ( कवितासंग्रह ) – नारायण सुमंत; अनुराधा प्रकाशन; करमाळा ( जि. सोलापूर ) ; १९८३; पृ. ६४; किं. ८ रुपये.
* **कुरुक्षेत्रावरील वर्तुळे** ( कवितासंग्रह ) – गौतम सूर्यवंशी; श्री रेणूका प्रकाशन, ९५ अ, विद्यानगर ( पूर्व ), सेलू ( जि. परभणी ) ; १९८२; पृ. ५७; किं. १० रुपये.
* **बुद्ध व भिक्खु आनंद**– शरद् पाटील; सत्यशोधक मार्क्सवादी प्रकाशन, येवले ( जि. नाशिक ); १९८३; पृ. २०; किं. ५ रुपये.
* **आंबेडकर-गांधी : तीन मुलाखती**– रत्नाकर गणवीर; रत्नमित्र प्रकाशन, आर. बी. ४, ९९६/बी, ४० बंगला, सी–रोड, भुसावळ ( जि. जळगाव ) ; १९८३; पृ. १०४; किं. १४ रुपये.
* **श्री. ना. पेंडसे : हस्तलिखित आणि परिष्करणे**– जयंत परांजपे; अमेय प्रकाशन, २ विजयानंद बिल्डिंग, वर्धा मार्ग, नागपूर– १२; १९८३; पृ. १४४; किं. ३० रुपये.
* **संशोधन-शलाका**– डॉ. सुरेश म. डोळके, अमेय प्रकाशन, वर्धा मार्ग, नागपूर– १२; १९८३; पृ. १६५; किं. ३० रुपये.
* **जुगलबंदी**– केशव मेश्राम; परिमल प्रकाशन, औरंगाबाद; १९८२; पृ. ८८; किं. १५ रुपये.
* **खतलेली माणसे**– केशव मेश्राम; दिनपुष्प प्रकाशन, कृष्णा बी- १२, गिरगाव, मुंबई ४००००४; पृ. १०८; किं. १७ रुपये.
* **अरुण कृष्णाजी कांबळे** ( कविता १९७०–८३ )– अरुण कृष्णाजी कांबळे; संकल्प प्रकाशन, ४६/१३९१, नेहरूनगर, कुर्ला ( पूर्व ), मुंबई ४०००२४; १९८३; पृ. ७२; किं. १० रुपये.

अनुक्रमणिका







मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास




नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

Registered No. SAT - 29 and Licenced to post without pre-payment–Licence No. 6



हे मासिक श्री. ग. दीक्षित यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून प्रे. पूं. रेगे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

अनुक्रमणिका




